# श्र द्धां ज ली



सं क ल क

**बा. द. सातोस्कर**



प्र का श क

दि महाराष्ट्र ग्रंथ भांडार, लिमिटेड.

मुंबई नं. ४

# प्रास्ताविक

महात्मा गांधींचें जीवन हें जागतिक इतिहासाचें एक दैदिप्यमान पान होतें. अनेक लोकोत्तर विभूतींशीं त्यांची तुलना करण्यात येते. परंतु स्वतःच्या हयातींत महात्माजींच्या व्यक्तिमत्त्वाची, जीवनकार्याची व तत्त्वज्ञानाची जेवढी भव्य प्रसिद्धी झाली तेवढी दुसऱ्या कुणाही विभूतीच्या वाट्याला आली नाहीं. पौर्वात्य तत्त्वज्ञानाचा आदर्श म्हणून पूर्वेंत आणि कालप्रवाहाच्या विरुद्ध आचार-विचाराचा प्रचार करणारे म्हणून पश्चिमेंत यांना सामान्य जनताही ओळखीत असे.

त्यांच्या जीवनाप्रमाणेंच त्यांचा मृत्यूही लोकविलक्षण ठरला. त्यांच्या अकल्पित वधानें जगात जेवढी खळबळ माजली, दुःखाची, वेदनेची, नैराश्याची जी एक लाट विश्वावर येऊन गेली तसली खळबळ, तसली लाट जगात यापूर्वी कुणाही महापुरुषाच्या मृत्यूनें निर्माण झाली नव्हती. ते तीन दिवस आकाशवाणीच्या विद्युल्लहरींना महात्मा गांधींचें जीवन आणि मरण यांचा इतिहास सांगण्याशिवाय दुसरें काम राहिलें नव्हतें. ज्या राष्ट्रांत कायदे मंडळांची अधिवेशनें चालू होतीं तीं दुखवट्याचा ठराव करून बंद होत होतीं. जगांतलीं यच्चयावत् वृत्तपत्रें गांधीजींच्या छायाचित्रांनीं आणि त्यांच्या स्तुतिपर रकान्यांनीं भरून जात होतीं. राजापासून रंकापर्यंत आणि विद्वान पंडितापासून आशिक्षित मजुरापर्यंत प्रत्येकाचें हृदय हादरून गेलें होतें आणि त्यांच्या तोंडून कांहीं ना कांहीं स्वयंस्फूर्त उद्गार निघून जात होते. अनेकांनी अनेक प्रकारें महात्माजींना गौरविलें.

प्रस्तुत पुस्तिकेंत महात्माजींबद्दल जगातल्या मोठमोठ्या पुढाऱ्यांनीं जे उद्गार काढले त्यांचा संग्रह करण्यांत आला आहे. वाचनांत आलेल्या सर्वच संदेशांचा यांत समावेश करण्यात आलेला नसून पहिल्या तीन दिवसांत प्रगट झालेल्या संदेशानाच त्यांत स्थान दिलें आहे. महात्मा-वधाच्या बातमीचा धक्का ताजा असतांना जे उद्गार निघाले ते स्वयंस्फूर्त आणि प्रामाणिक असावेत अशा कल्पनेनें हें धोरण अवलंबिलें. त्यानंतरच्या संदेशोद्गारांत भावनेपेक्षा बुद्धीचाच विलास अधिक दिसून येतो.

महात्माजींच्या अंतानें भारतात हाहाकार उडणें साहजिक होतें प. जवाहरलाल, वल्लभभाई पटेल, सरोजिनी नायडू प्रभृति त्यांच्या अंतेवासीयांना तर आभाळ फाटल्यासारखें वाटलें. कॉंग्रेस आणि मुस्लीम लीग धरून इतर साऱ्या राजकीय संस्थांच्या गोटांत विषादाची गडद छाया पसरली. भारतातील या आक्रंदनाचे सूर वाचकांना प्रस्तुत पुस्तिकेच्या पहिल्या भागात आढळतील

दुसऱ्या भागांत परदेशातील प्रतिक्रियेचे संकलन करण्यात आलें आहे. महात्माजींच्या निधनानें ज्या राष्ट्रांत अधिक खळबळ झाली तीं राष्ट्रें म्हणजे इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स व पाकिस्तान. लंडनमध्यें ही दुर्दैवी बातमी प्रसिद्ध झाली तेव्हां शहराचे सारे व्यवहार क्षणभर स्थगित झाल्याचा भास झाला. हिंदी स्त्री-पुरुष ढळढळां रडले. महात्माजींचा संबंध ब्रिटीश जनता आणि ब्रिटीश पुढारी यांच्याशींच अधिक आल्यामुळें इतर कोणत्याही देशापेक्षा ब्रिटनमध्यें दुःखाची भावना अधिक तीव्र होती. मजूरपक्षीय पुढाऱ्यांना गांधीजींवर स्तुतिसुमनें उधळतांना शब्द अपुरे पडले तर उदारमतवादी पुढाऱ्यांनीं त्यांच्या गौरवाबरोबरच त्यांच्या जीवनकार्याचें समीक्षण केलें. पण गांधीजींच्या कार्याचें रसग्रहण किंबहुना गुणदोषविवेचन केलें तें ब्रिटिश वृत्तपत्रांनीं. दि टाईम्स, मँचेस्टर गार्डियन इ. पत्रांतील उतारे पाहिले म्हणजे या विधानाचा वाचकांना प्रत्यय येईल.

अमेरिकेंत जी प्रतिक्रिया झाली तींत दुःखापेक्षां कुतूहलाची भावनाच अधिक होती. राष्ट्रसंघाच्या बैठकीला प्रथमच उपस्थित राहिलेल्या हिंदी शिष्टमंडळानें जी नेत्रदीपक कामगिरी केली तिच्यामुळें अमेरिकेंत हिंदुस्थानबद्दल कुतूहल निर्माण झालें होतें. राज्यकर्त्यांशीं लढाई केल्याशिवाय देश स्वतंत्र करण्याची किमया गांधीजींनीं केली या गोष्टीचें आश्चर्य अमेरिकनांना वाटत होतें. अमेरिकन वृत्तपत्रांनीं गांधीवधाला अमाप महत्त्व दिलें त्याचें कारण या घटनांत होतें. पण हें महत्त्व कृत्रिम नव्हते. किंवा ती स्टंटबाजीहि नव्हती. अमेरिकन वाचकांना गांधीजींबद्दल अधिकाधिक माहिती हवी होती, ती पुरविण्याचें काम तेवढें वृत्तपत्रांनीं केलें.

अमेरिकन जनतेला हिंदुस्थानबद्दल कुतूहलाशिवाय आपलेपणाही वाटत होता. या भावनेचें एक उदाहरण सुप्रसिद्ध लेखिका पर्ल बक यांनीं नमूद करून

ठेवले आहे गांधींच्या वधाची बातमी ऐकून पर्ल बक सुन्न होऊन रस्त्यातून चालल्या होत्या. त्याना थांबवून एका शेतकऱ्यानें विचारलें, "गांधींजींच्या खुनाची बातमी खरी काय?" त्यानी 'होय' म्हणताच त्याचे डोळे अश्रूंनी भरून आले आणि त्यानें प्रश्न केला, "त्याना का मारण्यात आलें?" पर्ल बकजवळ उत्तर नव्हतें. त्या स्तब्ध राहिलेल्या पाहून तोंच पुढें म्हणाला, "येशू ख्रिस्ताला तरी का मारण्यात आलें?" येशू ख्रिस्त आणि गांधीजी यांची तुलना जयकर, मॅकॉर्थर, जॉन होम्स यानीं करावी यांत आश्चर्य कसलें? पण तेच साम्य एका शेतकऱ्याला प्रतीत व्हावें यातच गांधीजींचा मोठेपणा.

लेक सक्सेसला राष्ट्रसंघाच्या सुरक्षा समितीच्या बैठकींत गांधी-निधनाची जी प्रतिक्रिया झाली ती कृत्रिम होती की अकृत्रिम होती हे अजून ठरावयाचे आहे. सुरक्षा समितींतील बाराही राष्ट्रांनी दुखवटा व्यक्त केला. जाहिरपणे दुखवटा व्यक्त न केलेल्या स्टॅलिन-मोलोटोव्हच्या रशियानें आद्रे ग्रोमिकोच्या मुखानें थोड्याशा मामुली पद्धतीनें कां होईना गांधीजींचा गौरव केला. पाकिस्तानच्या झाफरुल्लाखानानीं हृदयाला पीळ पाडणारें भाषण केलें. सेक्रेटरी प्राईसनीं जाहिर केलें कीं गांधीजींच्या तत्त्वप्रणालीवरच राष्ट्रसंघाचे कार्य चालू आहे.

राष्ट्रसंघांत हें दुःख जसें भाषणानीं तसें कृतीनेंही व्यक्त करण्यात आले. राष्ट्रसंघाचें निशाण अर्ध्यावर उतरविण्यांत आलें, आणि बैठक स्थगित करण्यांत आली. पण या साऱ्या उक्तींत आणि कृतींत स्वाभाविकता होती की मुत्सद्देगिरी होती याचा कस लागावयाचा आहे. आणि त्याची कसोटी म्हणजे काश्मीर व पॅलेस्टाइन.

भारताशिवाय जगांत इतरत्र कुठेंच जाणवला नाहीं एवढा मोठा धक्का पाकिस्तानला बसला असावा असें दिसलें. हिंद-पाक मधील जनता जणू गळ्यांत गळा घालून स्फुंदत होती. दिल्ली रेडीयोच्या आर्त हाकेला लाहोर रेडीयो तितकीच करुण साद देत होता. मिरवणुका, शोकसभा, हरताळ दोन्ही देशांत सारख्याच प्रमाणांत होत होते. पाकिस्तानचे गव्हर्नर जनरल जीना की गांधी असा संभ्रम निर्माण झाला होता. हिंद-पाकमधील कृत्रिम भिंत ते तीन दिवस तुटून-फुटून गेली होती.

पाकिस्तानी जनतेच्या सुरात पुढाऱ्यानींहि आपला सूर मिळविला होता हें लक्षांत घेण्यासारखें आहे. जगातील सर्व राष्ट्रांतून जे दुखवट्याचे संदेश आले, पत्रकें निघालीं, मुलाखती दिल्या गेल्या, त्यात पाकिस्तानी पुढाऱ्याचे संदेश, पत्रकें आणि मुलाखती अधिक कडगरसपूर्ण व द्वेषपूर्ण आहेत. हिंदी पुढाऱ्यापेक्षा, किंबहुना खुद्द कांग्रेसजनापेक्षाही पाक पुढाऱ्याचे संदेश अधिक करुणाई, गौरवपूर्ण आणि महात्माजींच्या तत्वज्ञानावर संपूर्ण निष्ठा व्यक्त करणारे आहेत. मात्र एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे ती ही कीं बहुतेकानीं आपल्या संदेशात 'महात्माजी हे मुसलमानाचे मित्र होते' हें पालूपद गायिलेलें आहे

फ्रेंच पुढाऱ्यांच्या संदेशात भावनात्मकता प्रतीत होते. त्याचे संदेश हृदयापासून स्फुरले असावेत असा भास होतो "जन्मभर हिंसेशीं युद्ध खेळणाऱ्या या महापुरुषाच्या मृत्युशय्येशेजारीं आजची रात्र फ्रान्स खडा आहे." असें बिदॉल्तनीं म्हटलें. ही भावना एकट्या बिदॉल्तची नव्हती सबंध फ्रान्सचें अंतःकरण त्या भावनेच्या पाठीमागे होतें.

थोडीशी आश्चर्याची गोष्ट अशी कीं ज्या देशात गांधींच्या निधनानें विशेष खळबळ माजावी अशी अपेक्षा होती ती काहींशीं चुकीची ठरली चीन, सयाम, इंडोनेशिया इ. देश आपला आध्यात्मिक व राजकीय पुढारी म्हणून हिंदुस्थानकडे पाहात आहेत. पण चँग-कै-शेक, सोकार्नो, हाटा यांच्याकडून जे संदेश आले त्यात हृदयाला पीळ पडल्याच्या खुणा दिसत नाहींत. त्या त्या देशात जी अंतर्गत यादवी चालू आहे त्यामुळें तेथील पुढाऱ्यांची मनें मरगळून गेलीं आहेत. त्याचाच हा क्रमप्राप्त परिणाम असावा.

अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स याच्या पार्श्वभूमीवर रशियांतली सामसूम चमत्कारिक भासते. कोणत्याही घटनेचा राजनैतिक दृष्टीनें फायदा करून घेण्याचें रशियन धोरण लक्षात घेतले म्हणजे स्टॅलिन-मोलोटोव्ह व प्रावदा इजवेस्तिया यानीं स्वीकारलेलें मौन चमत्कारिक भासतें. पांचवे जॉर्ज व प्रे. रूझवेल्ट यांच्या निधनानंतर तत्परतेनें दुखवटा व्यक्त करणारा रशियाचा सूत्रधार महात्माजींच्या निधनाच्या वेळीं मुग्ध कां याचें कारण कुणालाही अगम्यच भासेल.

जगातील नेत्यांच्या या उद्गाराकडे आणखी एका दृष्टीनेंही पाहता येतें बहुतेक संदेश प्रामाणिक आहेत असें म्हणावयाला हरकत नाहीं मनाला जें वाटते ते वाणीत व्यक्त करतांना कुणी थोडीबहुत अतिशयोक्ति केली असेल पण स्वत.च्या मनाविरुद्ध कुणी बोलले नसावें. चर्चिलचें उदाहरण घेऊन हा मुद्दा स्पष्ट करतां येईल. आपल्याला या नीच गुन्ह्यामुळे धक्का बसला इतकेंच त्यानी सांगितले चर्चिलचा हा प्रामाणिक अभिप्राय आहे. त्यापेक्षा अधिक त्याना काहीं वाटलें असते तर त्यांनीं ते सागण्यास कमी केलें नसते

प्रामाणिक संदेशाचे दुसरें सुंदर (!) उदाहरण जनाब जीनांचें. गांधींना ' महात्मा ' हे उपपद पाकिस्तानमधील सर्व पुढाऱ्यानीं लावलें. फक्त जीनांनीं तें लावले नाहीं. जन्मभर त्याना ते ' मिस्टर गांधी ' म्हणत आले. मृत्यू-नंतरही त्यानीं तेच म्हटले गाधीजी हे महापुरुष, युगपुरुष, बुद्ध, ख्रिस्त आहेत या गोष्टीवर जीनाचा विश्वास नव्हता. अर्थातच महात्माजीच्या निधना-नंतर त्यांनी तसे म्हटले असतें तर तो जीनाचा उमदेपणा ठरला असता, प्रामाणिकपणा ठरला नसता. " गाधी हे हिंदु जमातीनें निर्माण केलेले श्रेष्ठ पुरुष आहेत. " असे म्हणून " मुस्लीम जमातीने निर्माण केलेले श्रेष्ठ पुरुष म्हणजे जीना होत " असे आपल्या मृत्यूनंतर लोकांनीं म्हणण्याची त्यांनीं सोय ठेवली कीं काय हें मात्र सागता येत नाहीं

गांधींच्या पूर्ववयात ज्यानीं त्यांच्याशी दोन हात केले आणि हिंदद्वेष्टे म्हणून ज्याचा दुर्लौकिक आहे त्या मार्शल स्मटसचा संदेश नुसता प्रामाणिकच नव्हे तर उमद्या वृत्तीचा निदर्शक आहे. राष्ट्रसंघाच्या बैठकींत दक्षिण आफ्रिकन सरकारवर जोराचा हल्ला करून खालीं बसल्यावर विजयालक्ष्मी पंडिताची पाठ थोपटून त्याचें स्मटसनीं अभिनंदन केलें त्या प्रसंगाची वाचकाना या वेळीं आठवण होईल.

सर झाफरुल्लाखानाचे प्रभावी व्यक्तिमत्व व प्रभावी वक्तृत्व यांचा सुरेख संगम त्याच्या भाषणात झाला आहे. आजचे पाकिस्तानचे आणि भूतपूर्व हिंदुस्थानचे मुरब्बी मुत्सद्दी म्हणून त्याची जी ख्याति आहे ती त्याच्या या वक्तव्यावरून खरी आहे याची खात्री पटते.

मिसेस पर्ल बकचा संदेश हा हृदयाला पीळ पडलेल्या एका मानवतावादी लेखिकेचे आक्रंदन आहे तर जनरल मॅकार्थरचा संदेश धारादान नायकाचा शोक आहे

असल्या गंभीर प्रसंगीदेखील जे आपली मतें विसरूं शकत नाहींत अशा लोकाचें उदाहरण म्हणजे ब्रिटिश कॉम्युनिस्ट पार्टीचे रजनी पामदत्त किंवा कॉमरेड डांगे याचे संदेश पाहिजे म्हणजेही हीच गोष्ट दिसून येते. गांधीजींच्या आयुष्याबद्दल लॉर्ड लिनलिथगो व लॉर्ड वेव्हेल या दोन माजी व्हाइसरॉयांनीं जी कल्पना केली ती किती परस्परविरोधी होती हेंही पाहाण्यासारखें आहे

एकंदरीत या संदेशांमुळे महात्माजींच्या व्यक्तित्वावर जितका प्रकाश पडतो तितकाच ते संदेश पाठविणाऱ्यांच्या व्यक्तित्वावरही पडतो असे म्हणता येईल या दृष्टीनेंही वाचकांनीं ही पुस्तिका वाचावी

मुंबई ता. ९-४-४८ — भा द सातोस्कर



# भारताची श्रद्धांजली

## बापूजींचें बलिदान

### देवीदास गांधी

मला वाटणारें दुःख आणि माझ्या मनात उद्भवणारे विचार एक पितृहीन व्यक्ति या नात्याने माझ्या इतर बांधवांपुढें अशा थोड्या वेगळ्या आणि प्रत्यक्ष मार्गानें मांडण्यासाठी मी आज बोलत आहे. गेल्या शुक्रवारच्या सायंकाळपासून शारीरिक व मानसिक दृष्ट्याहि अधत्व आल्याचा भास होतो. मला वाटते हा भास माझ्या एकट्याच्याच वाट्यास आलेला नसावा.

पुत्र या नात्याने माझे बापूंच्यावर व पिता या नात्याने बापूंचे माझ्यावर किती गाढ प्रेम होते हे एक ईश्वरालाच माहीत. मी वीस वर्षांचा होतो त्यावेळी काशीला शिक्षणासाठी म्हणून आश्रमातून निघालो असता त्यांनी माझें निमिषमात्र घेतलेलें चुंबन माझ्या अद्यापि ध्यानात आहे. त्यातहि विशेष महत्त्वाची गोष्ट अशी की त्यापूर्वी केव्हांहि त्यांनी माझें चुंबन घेतल्याचे माझ्या ध्यानात नाहीं.

दिल्ली येथील त्यांच्या गेल्या काही महिन्याच्या मुक्कामात बापूकडून प्रेमपूर्वक कुरवाळले जाण्याचा हक्क माझ्या तीन वर्षे वयाच्या मुलाला लाभला होता. मी अगदींच मागे पडलो होतो. जेव्हा जेव्हा आमची बिर्ला हाऊसकडील फेरी चुके तेव्हा तेव्हा ते मला मी पुन्हा गेल्यानंतर म्हणत,

"तुझ्यापेक्षाहि बापू न भेटल्यामुळे मला चुकल्यासारखे वाटतें."

याचे आजोबा त्याचे स्वागत करताना जसे ओठ करीत त्याची नक्कल करून तें बालक आता आमच्या नेत्रांना पाणी आणते. तथापि संकुचित कुटुंबापुरती चौकशी गांधीजी क्वचित्च करीत व ते माझे वडील अशा संकुचित भावनेने मीहि त्यांच्याकडे अगदीं क्वचित पाही. तुम्ही सारेजण जसे त्यांच्याकडे एक साधुपुरुष म्हणून पहात होता तसाच मीहि त्यांच्याकडे पहात होतो. ते गेल्यामुळे तुमच्याप्रमाणेंच मलाहि शून्य व भकास वाटत आहे.

म्हणूनच या आपत्तीकडे उत्तर ध्रुवावर रहाणारा आणि रक्त अगर वंश याचें काहीच नातें नसलेला एखादा मनुष्य ज्या तटस्थ वृत्तीनें पाहील त्याच वृत्तीनें मी पहात आहे.

बापूंच्या निधनानंतर सुमारें तीस मिनिटांनीं मी त्यांच्याजवळ पोंचलों त्याचें शरीर तेव्हांहि गरम होते. त्याची त्वचा नेहमी तुकतुकीत, स्पर्श करण्यास मृदु व नैसर्गिक रीत्या सुंदर होती. त्याचा बाहु दोन्ही हातात घेऊन मी सौम्यपणाने दाबला तेव्हा काहीं झालें आहे असे वाटेना पण नाडी थांबली होती. आभाच्या मांडीवर डोकें ठेवून ते नेहमींप्रमाणेच आपल्या बिछान्यावर झोपी गेलेले दिसत होते. त्यांच्या शेजारीं सरदार पटेल आणि प नेहरू न बोलता स्वस्थ बसले होते. इतरहि पुष्कळजण स्फुदत स्फुंदत मंत्र म्हणत होते. मला उशीर झाला होता. मी बापूंच्या कानात मला क्षमा करण्याविषयी बोललो. पण व्यर्थ पूर्वी माझे छोटे मोठे गुन्हे त्यानीं इतक्या वेळा माफ केले होते कीं मला वाटलें या वेळींहि ते मला क्षमा करतील व फक्त एकदा माझ्याकडे डोळे उघडून पहातील. पण त्याचे ओठ घट्ट मिटले होते. आणि डोळे चिरविश्रांतिचा अनुभव घेत होते नेहमीच अवक्तशीर असणाऱ्या मुलाला न धमकावता परंतु निश्चितपणे जणूं काय त्याची मुद्रा असेंच म्हणत होती कीं,

"आता मला त्रास देऊ नका"

ती सर्व रात्र आम्ही जागून घालविली. त्यांची मुद्रा इतकी गंभीर होती व त्यांच्या भोवतीचें दैवी तेजाचे वलय इतकें गाढ होते कीं मृत्यूबद्दल शोक करणेंहि अशुभ वाटावें ता १३ जानेवारी रोजीं उपवास सुरू करतेवेळीं "अजोड मित्र" म्हणून बापूंनी मृत्यूचे स्वागत केलें होते.

बापूंनी प्रार्थनेस जाण्यासाठीं धारण केलेली वस्त्रें कांहीं धार्मिक विधीसाठीं आम्हीं उतरविलीं तो क्षण आम्हा सर्वांना खरोखरी असह्य व अविस्मरणीय वाटला बापूंचीं मोजकीं वस्त्रें नेहमीच स्वच्छ असत. त्या दिवशीं तीं अधिकच नीटनेटकी होती ज्या ठिकाणीं त्याच्यावर हल्ला करण्यांत आला त्या बागेंतील जागेवरील थोडी धूळ व गवताच्या काड्या त्याच्या बाह्य वस्त्राला चिकटल्य होत्या धूळ व गवतहि पडू नये अशी काळजी घेऊन आम्ही तें नीट केले शालीच्या घडीत एक मोकळी गोळी आढळली. त्यावरून गोळीबार अगदीं जवळून झाला होता हे सिद्ध होत होते छातीवर ते जो कापडाचा लहानसा तुकडा ठेवीत असत त्याच्यावर रक्ताचे मोठे डाग पडले होते. त्यांच्या लंगोटी-

खेरीज सर्व कपडे आम्ही काढले सर्वांच्या परिचयाचा "नंगा फकीर" दिसूं लागला मग मात्र आम्हाला रहावेना ते गुडघे, ते हात, ठराविक ढबीने मिटलेली बोटें, ते पाय सारें सारें शाबुत होते शरीर मसाल्यात घालून ठेवण्याची कल्पना मोह पाडीत होती परंतु हिंदु भावनेला तें सहन होत नव्हते बापूजींनी त्याबद्दल आम्हाला क्षमा केली नसती।

वृत्तपत्रात सविस्तर आणि विनचूक अहवाल आले असतांहि मृत्यु नाव ओढव आला काय याबद्दल अनेकांनी माझेकडे पृच्छा केली आहे

त्या दिवशी सायकाळी पाच वाजून दहा मिनिटांनी गांधीजी आपल्या खोलीतून बाहेर पडले उजवीकडे मनु व डावीकडे आभा यांच्या खांद्यावर हात ठेवून ते चालले होते बागेच्या पायऱ्या चढता चढता ते म्हणाले "आज उशीर झाला "

पाच वाजून जाईना ते सरदाराच्या बरोबर बोलत बसले होते व नेहमीप्रमाणें १ मिनिटाचा आराम न घेता प्रार्थनेसाठीं चालले होते इतक्यात ... इसम कोठून तरी पुढे आला व त्याच्याजवळ आला इतराप्रमाणे तोहि नमस्कार करीत आहे किंवा चरणधूलि घेत आहे असे वाटून मनुने त्याला दूर करण्याचा प्रयत्न केला पण तो झटकन आला व त्याने तीन वेळा गोळ्या झाडल्या गांधीजींना सर्व गोळ्या छातीवर उजव्या बाजूस लागल्या ... पडताच आभाहि पडली पण त्यांचे डोकें तिने कसेबसे मांडीवर घेतले गांधीजींनी "राम राम" म्हटलेलें त्यांनी ऐकलें दुःखातिशयानें ... कपाळावर हात बडवीत असतां त्यांचे प्राणोत्क्रमण झाले त्यांना घरात नेण्यापूर्वी पाच मिनिटात हा प्रकार झाला असावा मग अंधार पडला

त्या रात्रीं बापूंच्या भोंवती सर्व मंडळी बसली असतां प्रार्थनापूर्ण ... करणारे पण बालिशपणे मी आशा करीत होतों. मला वाटे काहीतरी होईल व सूर्योदयापूर्वी प्राण परत येतील. मग जसजसा वेळ जाऊं लागला व त्यांची निद्रा संपेचना तेव्हा मला वाटूं लागले की आता सूर्य उगवलाच नाही तर ... होईल. पण फुले आणावीं लागलीं व आम्ही त्यांच्या अंतिम यात्रेची तयारी करूं लागलों

मी छाती उघडी ठेवण्यास सांगितलें बापूंच्यापेक्षा सुंदर छाती कोणा योद्धयाचीहि नसेल मग आम्ही मंत्र व आमच्या आवडीचीं स्तोत्रें म्हणत त्यांच्या भोंवती बसलों रात्रभर लोक येत होते. दुसरे दिवशीं पहाटे फुलें आणणाऱ्यांनीं नाणीं व नोटा फुलांबरोबर वाहिल्या. ती हरिजन कार्यासाठी जमविलेली त्यांची अखेरची देणगी. परराष्ट्राचे वकील, त्यांचीं कुटुंबें व परिवार येऊं लागला. ही केवळ रूढीनें ठरवून दिलेली भेट नव्हती. त्यांच्या चिरपरिचित व्यक्तीला निरोप देण्यास ते आले होते

आदल्या रात्रीं एक अपवादात्मक प्रसंग माझ्या वाटणीला आला. बापूंची माझी एकांती गांठ पडली. शिरस्त्याप्रमाणें रात्रीं साडेनऊ वाजता मी त्यांना भेटण्यास गेलों ते बिछान्यावर पडले होते. पण वर्ध्याकडे जाणारी अगदीं पहिली गाडी गाठण्याबद्दल एका आश्रमवासीयाला सूचना देत होते मी आत पाऊल टाकताच त्यांनीं मला प्रश्न केला, "काय बातमी ?" मी पत्रकार आहे याची जाणीव करून देण्याची त्यांची ती पद्धत होती ते माझ्यापासून कांहीच नच कांहीं गुप्त ठेवीत. मी विचारलें कीं ते मला थोडक्यात सांगत. कधी कधीं न विचारताहि सांगत पण सामान्यतः अगदीं अवश्य तेव्हांच मी विचारावें व वर्तमानपत्रासाठीं माहिती वापरूं नये असा संकेत होता या बाबतीत त्यांचा माझ्यावर पूर्ण विश्वास होता

माझ्याजवळ उत्तर देण्यासारखें कांहीं विशेष नव्हते म्हणून मी प्रश्न केला "राज्याची नौका कशी चालली आहे ?"

ते उत्तरले, "किरकोळ मतभेद जातील याची खात्री वाटते मी वर्ध्याहून परत येईपर्यंत वाट पहावी लागेल पण त्याला कांहीं फार उशीर नाहीं सरकारात देशभक्त लोक आहेत व देशाला घातुक ठरेल असें कांहींहि ते करणार नाहींत कांहींहि झालें तरी त्यांनीं एकत्र राहिलें पाहिजे व ते राहतील तीव्र मतभेद नाहीं."

पुढेंहि असेंच बोलणें झालें व ते मी तसेंच चालू ठेवले असतें तर त्यावेळीहि "जमाव" जमला असता. म्हणून जाण्याच्या तयारीत मी विचारलें, "बापू, आता तुम्ही झोपणार असाल ?"

“ छे, घाई नाही. वाटल्यास आणखी काही वेळ बोलत रहाना.”

पण ही परवानगी दुसऱ्या दिवशी मिळाली नाही हे मी वर सांगितलेच.

त्याच्या आधी एक दिवस अशीच भेटीची रजा घेत असता मी म्हटले होते, “ उद्या प्यारेलाल माझ्याकडे जेवावयास येऊ द्यात.”

ते नेहमीप्रमाणे हसत हसत म्हणाले, “ हां, अवश्य. पण तू मला कधी बोलावतोस का ?”

रा. स्व. संघाविषयी एका काळी मलाही कौतुक वाटे. शारीरिक शिक्षण, कवाईत, पहाटे उठणे व शिस्तमय जीवन यावर त्यांची उभारणी झाली होती. पण पुढे त्यात स्वार्थी लोक शिरले व त्याचा अधःपात सुरू झाला.

हिंदु महासभा आणि रा. स्व. संघ या संस्थांतही अनेक माणसे अशी आहेत की ज्यांनी गांधीजींखातर स्वतःचे प्राण दिले असते. मूठभर लोकांच्या कृत्यासाठी आपण सर्वांना दोषी ठरविता कामा नये. हीच गोष्ट महाराष्ट्रीयांची. गुन्हेगारांना शिक्षा करावयाचे काम सरकारवर सोपवून सूड घेण्याचा विचार मनातून काढून टाकला पाहिजे. ७८ वर्षांच्या आयुष्यात बापूंना ईश्वराखेरीज आणखी कोणाचे संरक्षण होते ? भवितव्य भीषण आहे असे म्हणणे मला पटत नाही. बापू मुक्त झाले आहेत. ते शरीराने आपल्यात नाहीत पण त्यांचा संदेश आपणास नेहमीच प्रेरणा देत राहील.

## प्रकाश हरपला

**जवाहरलाल नेहरू**

“ बंधूनो व मित्रांनो, आपल्या जीवनातील प्रकाश हरपला आहे. जिकडे तिकडे अंधकार पसरला आहे. आपला परमप्रिय नेता, आपले बापू, आपल्या राष्ट्राचे जनक आता आपल्यात राहिले नाहीत. पण कुणी सांगावें, असें म्हणणेंच चूक नाहीं का ? काहीही असो, इतके खरें की गेली कित्येक वर्षे

आपण त्यांना जसें पाहिलें तसें यापुढें पाहूं शकणार नाही. त्यांच्याकडे सल्ला, मार्गदर्शन, दिलासा शोधण्यासाठी आतां धाव घेऊं शकणार नाही. आणि हाच मोठा आघात आहे मला एकट्यालाच नव्हे, लाखो करोडो देशबांधवांवरील आघात आहे हा. या प्रसंगीं मी किंवा दुसऱ्या कोणी तुमचें सांत्वन करणें मोठें कठीणच आहे.

आणि प्रकाश नष्ट झाला असें तरी कसें म्हणूं ? तें चूक आहे. कारण आपल्या मायभूमीवर तळपणारा हा प्रकाश साधासुधा नव्हता. अनेक वर्षे या देशाला प्रकाशित करणारा हा प्रकाश आणखी असंख्य वर्षे या देशाला प्रकाशित करील. हजार वर्षांनींही या देशांत तो प्रकाश तळपत राहील. जगालाही तो दिसत राहील. असंख्य अंतःकरणांना तो दिलासा देत राहील.

कारण वर्तमानापेक्षाही दिव्य असें काहीतरी त्या प्रकाशांत होतें. जिवंत अंतिम सत्याचा तो आविष्कार होता. यथार्थ मार्ग दर्शविणारा, चुकीच्या मार्गापासून आपल्याला परावृत्त करणारा, या प्राचीन भरतखंडाला स्वातंत्र्याप्रत नेणारा तो प्रकाश होता.

बापूजींच्या पुढें किती तरी कार्य असतांना ही घटना घडली आहे. गांधीजींची आतां आवश्यकता नव्हती, त्यांचे कार्य संपलें असें आपण म्हणूं शकत नाहीं. पण आतां आपल्याला अनेक अडचणींना तोंड द्यावयाचें आहे अशा वेळीं ते आपल्यांत नाहींत, हा आघात अगदीं असह्य होय.

एका पिसाट इसमानें गांधीजींची जीवनज्योत मालविली. हें कृत्य करणाऱ्याला मी पिसाटच म्हणतों. तथापि गेल्या काहीं वर्षांत व महिन्यांत देशांत मोठ्या प्रमाणावर विषपेरणी झाली आहे. लोकांच्या मनावर या विषाचा परिणाम झाला आहे. या विषबीजाचा नायनाट आपल्याला करावयाचा आहे. आपल्यापुढील सर्व संकटांना आपणास तोंड द्यावयाचें आहे. अर्थात पिसाटपणानें नव्हे कीं कुमार्गानें नव्हे, तर आपल्या प्रियतम गुरूनें शिकविलेल्या मार्गानें. आपण संतप्त असलों तरी गैरवागणूक करतां कामा नये हें ध्यानांत ठेवल

पाहिजे निश्चयाने व सामर्थ्याने आपण सर्व संकटाना धैर्यानें तोंड दिलें पाहिजे आपल्या महान नेत्याने, आपल्या महान गुरुनें दिलेल्या आदेशाचे पालन करण्याचा निश्चय केला पाहिजे

नेहमी ध्यानात ठेवा, त्याचा आत्मा आपल्याला पहात असेल आपण गैरवर्तणूक केली, काहीही हिंसा केली तर त्याच्या आत्म्याला अत्यंत दु:ख होईल

म्हणून आपण असे करता नये पण त्याचा अर्थ असा नव्हे की आपण दौर्बल्य पत्करावे. नाही, आपण एकवटून साऱ्या शक्तीनिशीं आपल्या-पुढील संकटाना तोंड दिले पाहिजे

या वज्राघाताने आपण जीवनातील सर्व महान गोष्टी दृष्टीपुढें आणल्या-पाहिजेत क्षुद्र गोष्टी विसरल्या पाहिजेत त्यांनी आपल्या मृत्यूनें आपल्याला जीवनातील महान तत्वाची आठवण करून दिली आहे त्या जिवंत सत्याची आपल्याला स्मृती करून दिली आहे आणि आपण ते सतत दृष्टीपुढें ठेवलें तर त्यात हिंदुस्थानचे हितच आहे

## शरमेची गोष्ट

### वल्लभभाई पटेल

दु:खाने माझें हृदय व्यथित झालें आहे. तुमच्याशीं काय बोलावें तें मला समजत नाहीं आज घडलेली घटना दु:खाची तितकीच शरमेची आहे.

मी आज दुपारी चार वाजता महात्माजींच्या भेटीस गेलों होतों. एक तासभर तिथे होतों पांच वाजता घड्याळ पहात ते म्हणाले, " प्रार्थनेची वेळ झाली आहे. " ते प्रार्थनेच्या मैदानाकडे निघाले मी घरीं यावयास निघालों घरीं येतों तो मला ही भयंकर बातमी सांगण्यात आली

मी तातडीने परत बिर्ला हाऊसकडे गेलो. त्यांचें दर्शन घेतले. त्यांच्या मुद्रेवर तोच नेहमींचा शांत व निर्मळ भाव दिसत होता. त्यांच्या मुद्रेवर क्षमा व दया यांचेच भाव होते

गेले कित्येक दिवस गांधीजींना देशातील परिस्थितीबद्दल असमाधान वाटत होतें. या असमाधानाचा परिणाम म्हणजे त्यांनीं नुकताच केलेला उपवास त्या उपवासातच त्यांना मृत्यु येता तर किती चांगले होते ! पण त्यांना कार्य करावयाचे होते. उपवासातून ते वाचले. त्यानंतर एका माथेफिरू तरुणाने त्यांच्यावर बॉंब फेकला. त्यातूनही ते बचावले पण आज मात्र त्यांचे प्राण वाचू शकले नाहींत !

आजचा दिवस दुःखाचा आणि संतप्त होण्याचा नव्हे. संतापाच्या भरात आपण गांधीजींनी जीवनभर शिकविलेली महान शिकवण विसरून जाऊं आम्ही त्यांच्या जिवंतपणीं त्यांचें ऐकले नाहीं त्यांच्या मृत्यूनंतरही आम्हीं त्यांना न अनुसरू तर तें मोठेंच लांछन ठरेल

आपल्या भावना काहीं असोत पण ही कसोटीची वेळ आहे हे विसरता कामा नये आपल्यामध्ये कोणत्याही प्रकारची फूट न पाडता आपण संघटितपणे व निश्चयाने खडे राहिलें पाहिजे

हिंदुस्थानवर नुकतीच प्रचंड जबाबदारी पडली आहे. त्या महापुरुषाचा पाठिंबा नसता तर या असह्य जबाबदारीखालीं आपण चिरडलों गेलो असतों आज आधार अंतरला आहे. तथापि गांधीजी नित्य आपल्या सन्निधच राहातील. कारण त्यांची शिकवणूक व ध्येय नेहमींच आपल्यासमोर राहील. त्यांच्या पार्थिव देहाची रक्षा होईल, पण त्यांचा आत्मा अनंतकाळ आपल्या सन्निधच राहील.

त्यांच्या जीवनांत जे साध्य झाले नाहीं ते आता पुरें केलें पाहिजे. या भयानक घटनेने हिन्दी तरुणांची विवेकवृत्ति जागृत होवो त्यांना कर्तव्याची जाणीव होवो निराश होऊं नका. खांद्याला खांदा लावून महात्माजींनीं सुरू केलेले कार्य संपूर्ण करा.

# अविश्वासाची जागा अभयानें घेतली पाहिजे

-बाबू राजेंद्र प्रसाद

आपल्याबरोबर बोलण्यासाठीं, आपली समजूत घालण्यासाठीं, आपणांस उत्तेजन देण्यासाठीं व आपणास मार्गदर्शन करण्यासाठीं आज महात्मा गांधी शरीराने आपल्यामध्ये नाहीत. पण त्यांनीच आपल्याला आजपर्यंत नाहीं का सांगितलें कीं शरीर नाशवंत आहे व केवळ आत्मा मात्र अमर आहे ? त्यांनीच आपल्याला नाहीं का सांगितलें कीं ' जोंपर्यंत परमेश्वराला माझ्या शरीराचा उपयोग करून घ्यावयाचा असेल तोंपर्यंत तो मला जिवंत ठेवील ? ' कदाचित् असेंहि होईल कीं शरीराच्या बंधनातून उडून गेलेला त्याचा आत्मा अधिक मोकळेपणानें आपलें काम सुरू करील व जें कांहीं अजूनही करावयाचें राहिले असेल तें पूर्ण करण्यासाठीं साधनें निर्माण करील ! असेंहि होईल कदाचित् की यमुनेच्या तीरावर पसरलेल्या रक्षेंतून अशा कांहीं शक्ति निर्माण होतील की ज्या गैरसमज व अविश्वास याचे ढग व धुकें नाहीसें करून, ज्या शांती-साठीं महात्मागांधींनीं आपले आयुष्य वेचलें, कष्ट केले व शेवटीं एका खुनी इसमाच्या गोळीला ते बळी पडले ती शांती प्रस्थापित करतील

हिंदुधर्मांत व मानव धर्मांतहीं-जें जे म्हणून थोर व उदात्त होतें त्या सर्वांचें महात्मा गांधी म्हणजे मूर्तस्वरूपच नव्हतें काय ? आणि तरी सुद्धा ज्या हृदयाला वंश, जात व देश याच्या मर्यादा ठाऊक नव्हत्या त्या हृदयासमोर बंदूक रोखून त्यांत गोळया घालणारे हात हिंदु इसमाचेच नव्हते काय ? या गुन्ह्यापाठीमागील हेतू कोणता होता ? हिंदुधर्माचें रक्षण करण्याचा ? हिंदु समाजाची सेवा करण्याचा ? अशा मार्गानें का हिंदू समाजाची सेवा घडणार आहे ? हिंदु धर्माच्या व हिंदू समाजाच्या इतिहासाचीं असंख्य पानें चाळा. तुम्हांला अशा प्रकारचें वाईट व विश्वासघातकी कृत्य दुसरें कोणतेंही सांपडणार नाहीं. कांहींही केलें तरी न धुवून जाणारा असा त्या इतिहासावरील हा कलंक आहे.

आपण सर्वच दु खी आहोंत. आपणा सर्वांनाच एक प्रकारचा भयंकर धक्का बसला आहे. पण आपण निराश होऊन चालेल काय ? आपल्याला महात्माजींचें शरीर दिसणार नाहीं. त्याचा आवाज ऐकूं येणार नाहीं, परंतु त्यांनीं आपणा सर्वांसाठीं एक अमोल वारसा नाहीं का पाठीमागें ठेवला ? आपलीं पाऊलें सतत पुढें पडत राहावीं म्हणून त्यानीं आपल्याला पुरेसें मार्गदर्शन व स्फूर्ति दिलेली नाहीं काय ? अशा भयंकर दुर्घटनेनंतरहि त्याचा आवाज आम्हाला आमच्या कर्तव्याची जाणीव करून देवो. त्यानीं मातीतून वीर निर्माण केले अन्याय, जुल्म व गुलामी यांच्या विरुद्ध आयुष्यभर चालविलेल्या त्याच्या लढ्यांत त्यानीं विविध प्रवृत्तींचा भरपूर उपयोग करून घेतला. भारताला आज त्याच शौर्याची, त्याच निर्भयतेची, न्यायाच्या स्थापनेसाठीं लागणाऱ्या त्याच धडाडीची आवश्यकता आहे. यासाठींच गांधींनीं आपलें आयुष्य वेंचलें होतें. ते जिवंत असताना आपण ज्याप्रमाणें त्यांचें अनुकरण केलें त्याप्रमाणेंच त्याच्या मृत्यूनंतरहि करायला नको कां ?

संतापाची अगर प्रत्याघाताची ही वेळ नव्हे. गांधीजींच्या शिकवणी-मध्यें यापैकीं एकासाठींहि जागा अगर वेळ नाहीं. आत्म्याचा नाश करणाऱ्या ज्या संकुचित धर्माभिमानामुळें गांधींचा मृत्यू शक्य झाला तो नाहींसा करण्याचा निश्चय करण्याची आज आवश्यकता आहे. गांधीजींच्या राजकीय, सामाजिक व आर्थिक कृत्याना नेहमींच दोन बाजू असत. एक नकारात्मक व दुसरी विधायक. कटु भावना नाहींशा केल्याच पाहिजेत. व त्यांची जागा अभेदानें घेतली पाहिजे. जातीय अविश्वास व वितुष्ट नाहींसें होऊन त्यांची जागा अभयानें घेतली पाहिजे. हीच त्यांची अखेरची इच्छा होती. आपण ती पुरी केली पाहिजे आपण ती करूंच.

# पिताजी, तुम्हांला शांति न मिळो !

**—सरोजिनी नायडू**

महात्माजी किती थोर होते, कसे अजातशत्रु होते, कसे जगद्वंद्य होते आणि ध्येयवादी, सत्यप्रिय, शांतताप्रेमी व सुसंस्कृत अशा सर्वांनाच ते किती प्रिय व पूज्य वाटत असत तें सारें जग आज असंख्य मुखांनीं, अगणित जिव्हांनीं बोलून दाखवीत आहे. महात्माजींची थोरवी यापेक्षा आणखी कोणत्या रीतीनें सिद्ध करतां येणार ?

महात्माजींनीं आपलें पहिलें उपोषण केलें त्यावेळीं मी त्यांच्या सान्निध्यांत होतें. महात्माजींचें तें उपोषण हिंदु-मुस्लिम ऐक्याकरितां होतें. त्यावेळीं सारा देश त्या उपोषणानें खडबडून जागा झाला होता. उपोषणामागची गांधीजींची भूमिका साऱ्या देशाला त्यावेळीं पटली होती. महात्माजींचें शेवटचें उपोषणदेखील हिंदु-मुस्लिम ऐक्याची प्रस्थापना करण्यासाठींच घडून आलें. पण त्या उपोषणांत मात्र साऱ्या देशाचा निरपवाद पाठिंबा त्यांना मिळाला नाहीं. यावेळीं राष्ट्र इतकें छिन्नभिन्न झालें होतें, त्याच्या वृत्ति एवढ्या कडवट झाल्या होत्या, द्वेषाच्या आणि संशयाच्या वातावरणानें देश एवढा व्याप्त झाला होता, आणि आपल्या उदात्त संस्कृतीचा त्याला इतका संपूर्णपणें विसर पडला होता कीं गांधीजींच्या त्या अंतिम उपोषणाचा अर्थ देशांतील फारच थोड्या लोकांना कळूं शकला.

अरेरे ! हिंदु समाजाचें हें केवढें विलक्षण दुर्दैव आहे कीं जो सर्वांत महान् श्रेष्ठ असा हिंदु होता, हिंदु धर्माचें ध्येय, तत्त्वज्ञान आणि आदेश यांचें ज्यानें अत्यंत निष्ठापूर्वक पालन केलें आणि 'हिंदु' या अभिधानाला इतर कुणाहिपेक्षां जो अधिक यथार्थतेनें पात्र होता त्या महात्म्याचा वध हा अखेर एका हिंदूच्याच हस्तें व्हावा !

आमच्यापैकीं कांहींजण हे महात्माजींशीं इतक्या निकटतेनें संबद्ध होते कीं आमचीं जीवितें ही एकमेकांचे अविभाज्य घटकच होऊन बसलीं होतीं. गांधीजी निधन पावले, त्यांच्याबरोबर आम्हींसुद्धां खरोखरी मृत झालों आहोंत. गांधीजींचा मृत्यु ही आमच्यापैकीं कांहींजणांवर एक दारुण शस्त्रक्रियाच झालेली आहे. कारण आमच्या चैतन्याचे धागे, आमचे स्नायु,

आमच्या मज्जा, आमचें हृदय आणि आमचें रक्त हे सारें महात्माजींच्या प्राणाशीं निगडित झालें होतें

परंतु असें असलें तरी या प्रसंगी आपण जर निराशेच्या आहारीं गेलों, गांधीजींच्या मृत्यूमुळे सारें कांहीं संपलें असें जर आपण समजूं लागलों तर आपण भ्याड ठरूं रणांगणावरून पळून येणारे आपण पळपुटे सैनिक ठरूं. आपणामधून गांधीजींचा पार्थिव देह गेला म्हणूनच जर आपण हातपाय गाळूं लागलों तर त्यांच्यावरची आपली सारी श्रद्धा निरर्थक ठरणार नाहीं काय ? महात्माजी गेले असतील, पण आपण अजून आहोंत ना ! महात्माजींचे अनुयायी, त्यांच्या आत्मोन्नतीच्या मार्गावरचे त्यांच्या पाठोपाठ जाणारे यात्रेकरू, त्यांच्या उदात्त ध्येयांचे वारसदार, आणि त्यांच्या महान् कार्यांतील मदतनीस असे आपण तर अद्याप मृत झालों नाहीं ना ? व्यक्तिगत दुःख आता पुरे. छाती पिटून आणि कपाळ झोडून आक्रोश करणे आता पुरे. आपण सर्वजण आता एकदिलाने उठून उभे राहूं या आणि एकमुखाने गर्जना करूं या कीं, "महात्माजींना ज्यांनीं विरोध केला त्यांच्या आव्हानाला निर्धारपूर्वक तोंड देण्यास आम्ही सिद्ध आहोंत." आपण महात्माजींचीं जिवंत प्रतीकें आहोंत. आपण त्यांचे शूर, निष्ठावंत सैनिक आहोत. युद्धांनी आणि हिंसेने व्याप्त झालेल्या या जगात गांधीजींचें शांततेचे निशाण उंच फडकत ठेवण्याची जबाबदारी आता आपल्यावरच आहे. 'सत्य' हा आपला ध्वज आहे. 'अहिंसा' ही आपली ढाल आहे. आणि साऱ्या जगाला प्रेमाने जिंकणारा बंधुभाव हे आपल्या हातातलें खड्ग आहे. आपल्या प्रिय नेत्याच्या पावलावर पाऊल टाकून आपण जाणार नाहीं काय ? आपल्या आदरणीय पित्याने दाखवून दिलेल्या तत्त्वाचें आपण पालन करणार नाहीं काय ? आपल्या शूर सेनापतीनें आरंभिलेला लढा आपण पुढें चालविणार नाहीं काय ? महात्माजींनीं दिलेला संदेश परिणत स्वरूपात आपण या जगाला पोंचविणार नाहीं काय ? महात्माजींचा कंठस्वर आज लुप्त झाला आहे. परंतु हजारों, लाखों कंठांनीं त्यांचा संदेश समकालीन जगाला आणि भविष्यकालीन पिढ्यांना द्यावयास नको काय ?

तीस वर्षांपूर्वी मीं स्वतःला महात्माजींच्या ध्येयाला शपथपूर्वक वाहून घेतलें होतें. आज लक्षावधि जनतेसह मी पुन्हा त्या शपथेचा पुनरुच्चार

करीत आहे मृत्यू म्हणजे तरी विशेष असे काय आहे ? माझे वडील ज्यावेळीं मरण पावले, त्यावेळीं ते म्हणाले होते, "मृत्यु ही चीजच जगांत नाहीं. येथे फक्त जीवन असते पुनर्जन्म असतो. लौकिकार्थानें ज्यावेळीं 'मृत्यू' येतो त्यावेळी आत्मा हा नष्ट होत नाहीं तो सत्याचे अधिकाधिक उच्च असे आलोक आक्रमीत असतो" महात्माजींचें क्षीण, दुर्बल असें पार्थिव शरीर भस्मसात झालें पण म्हणून गांधीजी मृत झाले असे आपणांस म्हणता यावयाचे नाहीं पुरातन काळीं ख्रिस्ताचे पुनरुत्थान झालें होतें. महात्माजी देखील त्याचप्रमाणें तिसऱ्याच दिवशीं पुन्हा आपल्या चितेतून पुन्हां उठलेले आहेत. त्याचें नेतृत्व, त्याचें मार्गदर्शन, त्याचें अपार प्रेम आणि त्यांची निरलस सेवावृत्ति याची जगाला अद्याप फार आवश्यकता आहे. या जगाच्या हाकेला 'ओ' देऊन महात्माजी पुन्हा आपल्यामध्ये आलेले आहेत.

दिल्लीमध्यें मृत झालेल्या आणि या भूमीमध्यें पुरलेल्या राजाच्या मध्यभागींच महात्माजींचे दहन व्हावे हें औचित्यपूर्ण असेच आहे. महात्माजींच्या अन्तिम विश्रांतीला हेच स्थान योग्य आहे. कारण ते स्वतः एक राजेच होते नव्हे, ते राजाधिराज होते इतकेंच नव्हे, तर या शांतिदूताची अंतिम यात्रा वीरोचित सन्मानासह व्हावी ही देखील मोठी अर्थपूर्ण गोष्ट आहे. कारण शांति युद्धाचा सैनिक हा जगातल्या इतर कोणत्याही युद्धांत लढणाऱ्या सैनिकापेक्षा अधिक शूर, अधिक निर्भय आणि अधिक निधड्या छातीचा असतो. महात्माजी तसे होते त्याच्या लहानशा तनूत वज्राची शक्ती भरली होती. ते एक उमदे लढवय्ये आणि सच्चे मित्र होते. शतकानुशतकाच्या दारुण गुलामगिरींतून आपल्या देशाची मुक्तता करणाऱ्या, त्याला त्याचे स्वातंत्र्य आणि त्याचा राष्ट्रध्वज परत मिळवून देणाऱ्या या महान् क्रांतिकारकाचें दिल्ली हे आता स्मारक होऊन बसलें आहे. दिल्ली हें आता तीर्थस्थान झालें आहे. पुण्यक्षेत्र झालें आहे

महात्माजींच्या, माझ्या धन्याच्या, माझ्या नेत्याच्या, माझ्या परमपूज्य पित्याच्या आत्म्याला कधींही शांति न मिळो ! शांति न मिळो ! पिताजी, तुम्ही सदैव अशान्तच रहा. आम्हाला आमच्या शपथेची एकसारखी स्मृति करून द्या. आम्ही तुमचे पुत्र, वारसदार, अनुयायी व शिष्य आहोंत. आम्ही तुमच्या उज्वल स्वप्नांचे संरक्षक आणि भारताचे भाग्यविधाते आहोंत. तुमचें अपुरें स्वप्न पुरें करण्याचें आम्ही वचन देतों त्या वचनाची परिपूर्ति करण्यासाठीं, पिताजी, तुम्ही आम्हाला शक्ती व आशिर्वाद द्या !

# हिंद सरकार व हिंदी वकिलाती

## गांधीजींच्या ध्येयसृष्टींतील राष्ट्र उभारूं

भारतावर व अखिल जगतावर अचानकपणें अनिवार आपत्ति कोसळली. गेलें अर्ध शतक ज्याच्यावर हिंदुस्थानचें भवितव्य अवलंबून होतें अशा मानवजातीचा अमूल्य ठेवा असलेल्या जीवनाचा एका दुष्ट हातानें शुक्रवारीं सूर्यास्त समयीं अस्त झाला. राष्ट्राचे पिते, जनतेचे लाल, अहिंसेचे प्रणेते शांतिदूत, संत, स्वातंत्र्याचे सैनिक आणि सर्वांत अधिक म्हणजे दीन दुबळ्यांचे कैवारी महात्मा गांधी सायंप्रार्थनेला निघाले असतां कालवश झाले. त्यांचा संदेश ऐकण्यासाठीं ज्या त्यांच्या प्रार्थनेला त्यांचे देशबांधव उत्सुकतेनें जमत त्या प्रार्थनेच्या वाटेवरच त्यांचा बळी पडला. एका महान् आपत्तीच्या दुःखांत चूर होऊनच सूर्यानें मावळतीच्या समुद्रात बुडी घेतली.

भारताचा श्रेष्ठ असा सुपुत्र आज निघून गेला आहे. त्याच्यासाठीं सर्व जग दुःखांत चूर होऊन गेलें आहे, व त्याच्या विशाल कर्तृत्वाला व आत्मतेजाला श्रद्धांजली वाहात आहे. कोट्यवधि जनतेचे जे स्फूर्तिस्थान होत, तिला ज्यांनीं उच्च तत्त्वांची शिकवण दिली होती, त्या गांधीजींच्या निधनानें दुःखमग्न असतानासुद्धां आपल्याला असा नेता लाभला होता याबद्दल हिंद सरकारला अभिमान व कृतज्ञता वाटत आहे. जीवनाप्रमाणेंच मृत्यूनंतरसुद्धां त्यांचा चेहरा शांत आणि स्मितपूर्ण होता. त्यांच्या चेहऱ्यावर प्रेम ओसंडून राहिलें होतें. सत्य-अहिंसेचा संदेश मूर्तिमंत त्यांच्या चेहऱ्यावर दृग्गोचर होत होता. त्यांचे सर्व जीवन म्हणजे न्यायाकरिता व मानवजातींत सहिष्णुता वाढावी याकरिता चाललेला झगडा होता.

महात्मा गांधींच्या पूज्य स्मृतीला सादर श्रद्धांजली अर्पण करतांना हिंद सरकार त्यांची शिकवण अंमलात आणण्याकरतां आटोकाट प्रयत्न करण्याचा आपला निर्धार व्यक्त करीत आहे.

त्यांनीं ज्या भारतावर असीम प्रेम केलें आणि ज्याची अखंड सेवा केली त्याचें त्यांचा आत्मा सतत मार्गदर्शन व रक्षण करील. भारत आणि भारताची

शि ।वण ही त्यांच्या श्रेष्ठ व्यक्तित्वांतच एकजीव झाली होती. म्हणून आपण सर्व गांधीजींना आणि हिंदुस्थानला जागून त्यांच्या ध्येयसृष्टींतील राष्ट्र उभारण्याकरता प्रयत्न करूं या.

हिंदी मध्य सरकारचा ठराव.

## शतकांनी निर्माण होणारा पुरुष

गांधीजींसारखा पुरुष जगाला कित्येक शतकातही दिसणार नाही. आता फक्त त्याच्या तत्त्वाचें आचरण झालें तर जगाचें दुःख कमी होण्याचा संभव आहे.

**लॉर्ड लुई माऊंटबॅटन**, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय

## जगाचें नुकसान

माझें हृदय भाराक्रांत झालें आहे. मला शब्द सुचत नाहींत. गांधीजींचा मृत्यु हें जगाचें नुकसान आहे. जास्तीत जास्त जें आता आम्ही करूं शकूं तें हें कीं गांधीजींनीं आम्हांला शिकवलेल्या तत्त्वांप्रमाणें चालण्याचा प्रयत्न करणें.

**लेडी माऊंटबॅटन**

## जग हादरलें, कांपलें

आमच्या आयुष्यांतील दुःखातिरकाचा हा क्षण आहे. महात्माजींनी दिलेल्या शिकवणीप्रमाणें आम्ही वागलों असतों तर या अत्याचाराला ते बळी पडले नसते. जग हादरून कापून गेलें आहे. आमचीं उर्वरित आयुष्यें त्यांचें अपुरें कार्य करण्यासाठी आम्ही वाहिलीं पाहिजेत. त्यांच्या कार्याचें महत्त्व आमच्या युगांत पारखलें जाणार नाहीं...मला अधिक बोलतांच येत नाही.

**व्ही. के. मेनन**, इंग्लंडमधील हिंदी हायकमिशनर

## मनोयातनांच्या क्षणीं मी काय सांगूं ?

वैयक्तिक आणि राष्ट्रीय मनोयातनांच्या या क्षणीं मी काय सांगूं शकेन ! इतकेंच सांगतें कीं ज्या पवित्र कार्यासाठीं बापूंनीं देह ठेवला त्या कार्याच्या सिद्धयर्थ मी निग्रहपूर्वक झटेन असें आश्वासन देतें.

**विजयालक्ष्मी पंडित**

## धगधगत्या क्रॉसवर बलिदान

महात्मा गांधींचा मृत्यु ही हिंदुस्थानच्या इतिहासांत मन थरारून सोडणारी शोककथा आहे. मानवातील श्रेष्ठतम व उदात्ततम विभूतीला जग अंतरलें आहे. सत्य, प्रेम व शांति यांच्या प्रेषिताची ती साकार, सावयव मूर्ति होती.

त्याचा संदेश साऱ्या मानववंशासाठीं होता. पार्थिव जगातून जरी त्याचा आत्मा मुक्त झाला असला तरी मानवजात आपल्या उद्धारासाठीं त्याच्या उच्च शिकवणींतून स्फूर्ति घेण्याचें कार्य चालूच ठेवील.

शांतीचे सम्राट येशू ख्रिस्ताप्रमाणेंच महात्मा गांधी धगधगत्या क्रॉसवर मृत्यू पावले आहेत. हिंदुस्थानच्या इतिहासांतील अत्यंत आणीबाणीच्या क्षणीं घडलेल्या त्याच्या मृत्यूच्या घटनेंत अतिभयंकर आणि अमाप परिणामाचीं बीजें ठासून भरलेलीं असलीं तरी अंतीं त्यांच्या स्वप्नांतील हिंदुस्थान, त्यांच्या चिरंजीव स्मृतीला शोभणारा सात्विक हिंदुस्थान अवतरल्याशिवाय खास राहाणार नाहीं.

**असफ अली**
हिंदुस्थानचे अमेरिकेंतील वकील

# प्रांतांचे गव्हर्नर

एका बेशुद्ध वेड्याच्या हातून आमचें ऐश्वर्य नष्ट झालें. निराशेच्या या क्षणीं ईश्वर भारताला सहाय्य करो. आमच्या प्याऱ्या नेत्याच्या बलिदानानें सारा द्वेष, सारा संशय नाहींसा होवो.

**सी. राजगोपालाचार्य**
पश्चिम बंगालचे गव्हर्नर

## भारताचें भाग्य

या अघोर अत्याचाराने जें दुःख झालें तें वर्णन करण्यास मजजवळ शब्द नाहींत. इतर कोणत्याही राष्ट्राला केव्हाही लाभलें नाहीं तें नेतृत्व हिंदुस्तानला लाभलें होतें. जगांतील सारीं राष्ट्रें असा नेता लाभावा म्हणून डोळे लावून बसलीं आहेत. पण त्यांच्या तें नशिबीं नाहीं. त्यानीं जीं तत्वें शिकविलीं त्याप्रमाणें आम्ही मद्रासमध्यें वागण्याचा थोडाफार यशस्वीपणें प्रयत्न करीत आहों. महात्मा गांधी गेले तरी त्याचा कीर्ति, त्याचा मोठेपणा, आणि त्याहून अधिक त्याचें उदाहरण हीं चिरंजीव होतील.

**सर आर्चिबाल्ड नाय**, मद्रासचे गव्हर्नर

## दुसऱ्यांसाठीं जीवन

जगांतल्या सर्वश्रेष्ठ पुरुषाचा खून व्हावा ही घटनाच भीषण वाटते. गाधी दुसऱ्यासाठीं जगले आणि दुसऱ्यासाठींच मेले. मानवजातींत शातता व एकोपा व्हावा म्हणून त्यांनीं जन्मभर प्रयत्न केले.

**सर महाराज सिंग**, मुंबईचे गव्हर्नर

## गांधी आमच्या हृदयांत अमर आहेत

महात्मा गाधी मरण पावले. परतु महात्मा गांधी आमच्या हृदयांत अमर आहेत. आजच्या महान् आपत्तींत आमच्याकडून त्याच्या ज्या अपेक्षा होत्या त्या आम्ही पुऱ्या करूं. ही घटना जरी चीड आणणारी असली तरी त्यांनीं दिलेली प्रेम, दया व सुहृद्भावाची शिकवण पाळली गेली पाहिजे.

**मा. श्री. अणे**, बिहारचे गव्हर्नर व
**श्रीकृष्ण सिंह**, बिहारचे मुख्य प्रधान

## निराश्रितांचा आधार

राष्ट्रपिता आणि निराश्रितांचा आधार महात्मा गांधी यांच्या मृत्यूनें आम्ही स्तंभित झालों. त्यांचा महान् आत्मत्याग आम्हांला स्फूर्ति देवो आणि मार्गदर्शन करो.

**सर अकबर हैदरी**, आसामचे गव्हर्नर

# कॉंग्रेस पुढारी

## हिंदी नेत्यांची निर्णायक परीक्षा

ही भयानक घटना अनिर्वचनीय आहे. आजच्या युगांतील सर्वश्रेष्ठ आत्म्याचें हें उच्चाटन आहे. राष्ट्र पोरकें झालें बापूंच्या रूपानें हरिजनाचा हितकर्ता, त्यांचें सर्वस्व गेले. आमचें बालस्वातंत्र्य, त्या बालस्वातंत्र्याची आमची पात्रता कसाला लागली आहे. आणि बापूंच्या रूपानें आमच्यावर असलेला ईश्वरी वरदहस्त आकस्मिकपणे निघून गेल्यामुळे दुष्टपणा आणि सुष्टपणा, विरोध आणि ऐक्य, परागति आणि प्रगति यामधील सरळ सरळ युद्धाचें स्वरूप आमच्या या कसोटीला आलें आहे हे महान् आव्हान आहे निर्णायक परीक्षा आहे.

**जगजीवनराम**, हिंदी संघाचे मजूर मंत्री

## संतांना राहण्यासाठीं जग सुरक्षित केव्हां होईल ?

आमच्या काळांतला अति पवित्र, अति उच्च व अत्यंत स्फूर्तिदायक पुरुष एका वेड्यापीराच्या क्रोधाला बळी पडावा ही घटना एवढेंच दर्शविते कीं विषप्राशन करणारा सॉक्रेटिस किंवा क्रॉसवर चढवण्यात आलेला जीझस यांच्या काळापासून आमच्यात काहींच सुधारणा झाली नाहीं.

महात्मा गांधी—सरत्या भूतकाळाचें एकुलतें एक प्रतीक—आमच्यातून गेले आहेत. त्याचे शरीर ठार करण्यात आलें. परंतु सत्य आणि प्रेमाच्या दैवी ज्योतींतून निघणाऱ्या त्यांच्या आत्म्याचा प्रकाश कुणीही मालवूं शकत नाहीं.

संतांना राहाण्यासाठीं जग सुरक्षित केव्हा होईल ? दोन्ही संघराज्यांना, जगांतील सर्व राष्ट्रांना समजून येवो कीं हिंसा, क्रौर्य नी अत्याचाराच्या नरकांत आपणाला शिरावयाचें नसेल तर आपल्यापुढें एकच एक मार्ग आहे. महात्मा गांधी ज्यासाठीं जगले आणि मेले, तोच तो मार्ग.

**प्रा सर्वपल्ली राधाकृष्णन्**

## मानवतेची विवेकबुद्धि

महात्मा गांधींनी भारताला स्वराज्य मिळवून दिलें आणि यापुढें सुराज्य मिळवून देण्याचे त्याचे प्रयत्न चालू होते.

गांधीजी हे मानवतेची विवेकबुद्धि होते. शांतता, सद्भाव आणि समजुतदारपणा यांचा जगात प्रसार करण्याचे जीवापाड प्रयत्न करीत असतांना आणि भारताला त्याची अत्यंत गरज असताना अशा क्रूर पद्धतीनें त्याना आमच्यातून उचलून नेणें हा आमच्या काळातील एक महाभयंकर दुःखकारक घटना आहे

त्याचे कार्य पुढे चालू ठेवण्याची जबाबदारी मागे राहिलेल्यांवर आहे. महात्माजीपूर्वी होऊन गेलेल्यानीं हेच कार्य केलें आणि त्यांनाही तत्कालीन जनतेकडून अशीच वागणूक मिळाली. आणि तरीही त्यांच्या कार्याला फळें धरत आहेत.

महात्माजींच्या विचारसरणीला तीव्रतेनें विरोध करणारे शेंकडों लोक हिंदुस्थानात आहेत हें मी जाणतों पण स्वातंत्र्याला जर ते मानीत असतील, भारतावर जर त्यांचे प्रेम असेल, आमचें नवजात स्वायत्त राष्ट्र चिरडून जाऊन नष्ट होऊ नये असें जर त्यास वाटत असेल, तर शांत रहा, भडकू नका अशी मी त्याना विनंति करीन.

गांधीजी गेले गांधीजी चिरायु होवोत !

**बा. गं. खेर, मुंबईचे मुख्य प्रधान**

## महान् अरिष्ट

गांधीजी आता आपल्यात नाहींत. नियतीच्या क्रूर हातानें त्यांना आमच्यांतून ज्या पद्धतीनें उचलून नेलें आहे, त्यामुळें सहाजिकच आमचे रक्त तापलें आहे. आपल्या राष्ट्रावर ओढवलेलें हें सर्वांत मोठें अरिष्ट या अरिष्टाचा आकस्मिकपणा आणि या भूमींत शांतता प्रस्थापित करण्याकरता गांधीजींचे जे प्रचंड प्रयत्न चालले होते ते लक्षांत घेतां दुर्दैवाचा हा फटका भयंकर वाटतो. त्यांच्या शारिरिक उपस्थितीची आजच्याइतकी गरज राष्ट्राला केव्हांही भासली नाहीं. बहुजनसमाजावरील जबरदस्त संयमाची पकड त्यांच्या मृत्यूमुळें एकदम सुटली आहे

**स. का. पाटील**
मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष

## गांधीजी सम्राट होते आणि तपस्वीही होते

गांधीजींनी हिंदुस्थानला राष्ट्राचा दर्जा मिळवून दिला. आम्हाला स्वातंत्र्य मिळवून दिलें. गुलामाना माणसात आणले हिंदी जनतेला आर्यसंस्कृतीबद्दलचा अभिमान पुन्हा मिळवून दिला. गांधीजी हे सम्राट होते, तपस्वी होते राष्ट्राचे जनक होते. त्यानी आपले कार्य केले आणि ते निघून गेले.

**कन्हयालाल मुनशी**

## बापूंची जागा रिकामी राहील ?

बापूंची जागा दुसरा कुणीही घेऊ शकत नाहीं. म्हणूनच राष्ट्रांत जें जे उदात्त आहे, सत्य आहे, सामर्थ्यशील आहे त्याची तावडतोब गुंफण करून ही पोकळी भरून काढली पाहिजे.

**लाला भीमसेन साचार**

## दलितांची सेवा हा धर्म

महात्मा गांधींच्या निधनाने हरिजनांचाच नव्हे तर जगाचा थोर मित्र नाहींसा झाला आहे. शब्दानीं व्यक्त करण्यासारखी ही अनर्थकारक घटना नव्हे. बापूंचें जीवित आणि मृत्यु हा द्वेषावर प्रेमानें मिळविलेला फार मोठा विजय आहे. दलिताची, दुःखिताची सेवा हा त्याचा धर्म होता.

**जी. डी. तपासे**, मुंबईचे हरिजन मंत्री

## अनिर्वचनीय

काहीही सांगण्याच्या मनस्थितींत मी नाहीं. माझी शुद्ध हरपली आहे. ईश्वर आमच्या राष्ट्राला मदत करो.

**ओ. पी. रामस्वामी रेड्डीयार**
मद्रासचे प्रधान मंत्री

## राष्ट्राला कायमचा कलंक

गांधीजी जिवंत आहेत. आम्हीच मेलो आहों. राष्ट्राला लागलेला हा कायमचा कलंक आहे.

**एम. भक्तवत्सलम**, मद्रासचे माहिती मंत्री

## स्वातंत्र्याच्या शिल्पकाराचा स्वातंत्र्यानेंच बळी घेतला

ही बातमी म्हणजे अस्मानातून झालेला जणुं विद्युत्पात. आमचें मन आणि बुद्धि बधिर झाली आहे गांधीजींना इतिहासकार ख्रिस्त आणि बुद्ध यांच्या जोडीला बसवील आमच्या स्वातंत्र्याचा शिल्पकारच स्वातंत्र्याचा पहिला बळी ठरावा ही कल्पनाच असह्य वाटते.

**अविनाशलिंगम् चेट्टियार**
मद्रासचे शिक्षण मंत्री

## वडिलांच्या मृत्यूपेक्षां अधिक

प्रत्यक्ष माझ्या वडिलांच्या मृत्यूनेंही मी इतका हबकून गेलों नसतों जगांतल्या या महापुरुषाने आम्हाला स्वातंत्र्य मिळवून दिले आणि सहा महिन्यांच्या आत आपण निघून गेला त्यांच्या देखरेखीखालीं आम्हीं आमचें नवराष्ट्र घडवणार होतों आता त्यांच्या ध्येयाप्रमाणें तें घडविण्यासाठीं परमेश्वर आम्हाला सहाय्य करो

**काला वेंकट राव**, मद्रासचे महसूल मंत्री

## सत्याचा व प्रकाशाचा शोधक

भारताला पूर्ण अंधारात लोटून सत्याचा व प्रकाशाचा शोधक निघून गेला आहे. आपला उदात्त आत्मा गेल्याबद्दल जग शोकमग्न झालें आहे. प्रत्येकाच्या डोळ्यांतील प्रत्येक अश्रु पुसण्याची इच्छा करणारा महात्मा प्रत्येकाच्या डोळ्यात नवीन अश्रू आणून निघून गेला आहे या अश्रूंनी जर आमच्यांतली द्वेषाची भावना धुवून गेली तरच आम्ही त्यांचे अनुयायी म्हणून राहूं शकूं.

**डॉ. आर. एम्. अलगाप्पा चेट्टियार**

## राष्ट्रपिता नव्हे, प्रत्यक्ष राष्ट्र

महात्मा गांधींच्या मृत्यूनें जग दुबळें झालें. ते नुसते राष्ट्रपितेच नव्हते, प्रत्यक्ष राष्ट्र होते. रक्तहीन क्रांतीचा जनक रक्तानें तहानेलेल्या इसमाच्या गोळीला बळी पडावा ही भीतिदायक गोष्ट आहे.

**जे. पी. श्रीवास्तव**

## हिंदी भवितव्याचे मार्गदर्शक

हिंदु म्हणवून घ्यायला मला लाज वाटते. कारण हिंदुस्थानच्या भवितव्याचे मार्गदर्शक आणि जनक महात्मा गांधी याच्यावर एका हिंदूने दुर्नीव निंद्य हल्ला केला.

गंगाधरराव देशपांडे

# समाजवादी

## भारत पितृहीन झाला

ज्यावेळीं महात्मा गांधींच्या शहाणपणाची आणि नैतिक शक्तीची अत्यंत गरज होती अशा आणीबाणीच्या वेळीं हिंदुस्थान पितृहीन झाला. जें राष्ट्र महात्माजींनीं स्थापित केलें, आणि ज्याचें राष्ट्रीय ऐक्य राखण्यासाठीं त्यांनीं बलिदान केलें तें जिवंत राहील ना ? अशावेळीं दुष्ट आणि संहारक शक्ती चिरडून टाकण्यातच राष्ट्राचा तरणोपाय आहे.

जयप्रकाश नारायण

## गांधीजींच्या नेतृत्वास हिंदुस्थान अपात्र

प्रतिगामी शक्तींच्या उठावामुळें गेले कांहीं दिवस गांधीजींसारखा नेता लाभण्यास हिंदुस्थान अपात्र ठरला होता. त्यांच्या खुनाची जबाबदारी केवळ त्यांच्यावर गोळ्या झाडणाऱ्या माथेफिरूवर नसून सर्वांवर आहे गांधीजींना देशाच्या फाळणीमुळें मरणप्राय दुःख झालें होतें. या विपन्नावस्थेंत त्यांना जगावेंसें वाटत नव्हतें.

कॉंग्रेस समाजवाद्यांच्या कर्तबगारीवर त्यांचा विश्वास होता.

अरुणा असफअली

## ती गोळी राष्ट्राच्या हृदयांत घुसली

गांधीजींच्या छातींत घुसलेल्या गोळीनें गांधीजींचाच शेवट केला असे नसून सबंध राष्ट्राच्या हृदयात ती गोळी घुसली आहे. चालू शतक हें सामान्य माणसाचें आहे धर्माच्या नावाखालीं सामान्य माणसाला चुकीच्या मार्गावर नेण्याचे जे प्रयत्न चालू आहेत त्याना गांधीजींना विरोध करावयाचा होता.

आचार्य नरेंद्र देव.

# हिंदु महासभा

## उदात्त आत्मा

महात्मा गांधांच्या मृत्युवार्तेनें माझ्यावर जणुं आकाशांतून वज्राघात झाल्याचा भास झाला. त्याच्या निधनानें जग एका उदात्त आम्त्याला मुकले आहे. तें खरोखरच अधिक अनाथ झालें आहे.

ल. ब. भोपटकर
हिंदु महासभेचे अध्यक्ष

## हिंदुधर्मावर आघात

आमची मातृभूमि नव्हे सारें जग ज्या तेजानें उज्ज्वल झालें होतें तें आज अकस्मात लुप्त झालें. ज्यानें भारताला स्वतंत्र व स्वावलंबी बनविलें, जो सर्वांचा मित्र व कुणाचाही शत्रु नव्हता त्या महात्माजींवर त्यांच्याच एका धर्मबंधूनें व देशबंधूनें आघात करावा ही अत्यंत शरमेची गोष्ट आहे.

ज्यांचा प्रभाव कधींहि नष्ट होत नाहीं, उलट कालक्रमानें वाढत जातो अशा अद्वितीय पुरुषांपैकीं महात्माजी एक होते. त्यांच्यावर झालेला आघात हा त्याच्या शरीरावर झालेला आघात नव्हे तर हिंदुधर्माच्या हृदयावर झालेला आघात होय.

शामाप्रसाद मुकर्जी
भारतीय हिंदु महासभेचे माजी अध्यक्ष
व मध्यवर्ति हिंदी मंत्री

## तेजस्वी तारा निखळून पडला

विश्वाच्या अवकाशांतून एक तेजस्वी तारा कोसळून पडला गांधीजींच्या निर्गमनानें या देशावर उत्पात आणि गोंधळ याचें संकट ओढवेल अशी मला भीति वाटते.

**आशुतोष लाहिरी**
भारतीय हिंदु महासभेचे सरचिटणीस

## जबरदस्त धक्का

गांधीजींवरील हल्ल्याची बातमी ऐकून माझ्या अंतःकरणाला इतका जबरदस्त धक्का बसला कीं तो शब्दांनीं वर्णन करणें अशक्य आहे. पं. नेहरूंनीं दिलेल्या संदेशाप्रमाणे देशांत शांतता व सुव्यवस्था निर्माण करणे आपलें कर्तव्य आहे. आपण सगळे राष्ट्रीय झेंड्याखालीं एकत्र येऊन राष्ट्राच्या स्वातंत्र्याचे रक्षण करूं या.

**वि. दा. सावरकर**

## हिंदुत्त्वावर आघात

आमच्या युगांतले ते महत्तम पुरुष होते. त्यांचा खून हें महाभयानक कृत्य आहे. हिंदुत्वावर झालेला तो जबरदस्त आघात होय.

**राजा नारायणलाल बन्सीलाल**

## महान् तत्ववेत्ता

राष्ट्रपित्यावरील या भ्याड हल्ल्याचा आम्ही निषेध करतों. गांधीजींच्या मृत्युमुळें आमचा एक मार्गदर्शक व देशांतील महान् तत्त्ववेत्ता नाहींसा झाला आहे. त्यांच्या तत्त्वांचें पालन करणें हें आमचें श्रेष्ठ कर्तव्य होय. राष्ट्रपुढाऱ्यांचे हात बळकट करून राष्ट्राची इमारत बलवान करणें हें आमचें कर्तव्य आहे

**राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या**
**मुंबई शाखेचे अध्यक्ष**

# हिंदी मुस्लिम लीग

## वज्राघात

महात्मा गांधींच्या मृत्यूच्या बातमीनें वज्राघाताचा धक्का बसला अति भयानक आणि अवर्णनीय असें हें अरिष्ट असून मानवतेवर पडलेला घाला आहे. ईश्वर मानवजातीचें रक्षण करो

**महंमद इस्माईल**
हिंदी मुस्लीम लीगचे सरचिटणीस

## जगाची शक्ति

अहिंसेचें प्रतीक या दृष्टीनें महात्मा गांधी जगाची सामर्थ्यवान् शक्ति होते जगाच्या ह्या हृदयविदारक दुःखांतिकेने माझे मन जड झालें आहे माझ्या भावना प्रगट करण्यास मजजवळ शब्द नाहींत

**हाजी हसनअल्ली पी. इब्राहीम**
मुंबई प्रांतिक मुस्लीम लीगचे अध्यक्ष

## दीप मालवला

मानवतेला न्यायाचा रस्ता दाखविणारा दीप मालवला गेला

**अब्दुर रहमान**
पश्चिम बंगाल मुस्लीम लीग पार्टीचे कायदेमंडळातील पुढारी

## मुसलमानांची हानि

हिंदुस्थानांतील मुसलमान त्याचे यावजन्म ऋणी आहेत. त्यांचें आकस्मिक व अकाल निधन ही राष्ट्राची आणि विशेषत मुसलमानांची भयंकर हानि आहे

**अब्दुल्ला नुरूल हक्क**
आसाम मुस्लीम लीगचे अध्यक्ष

# विविध पक्ष

## राष्ट्रावर आघात

महात्मा गांधींची भयंकर हत्या हा राष्ट्रावर झालेला आघात होय हा कलंक धुवून काढावयाचा असेल तर जातीयतेच्या सैतानाचें निर्मूलन करण्यासाठीं सर्व जमातींनीं ऐक्य केलें पाहिजे.

**हुसेनभाई लालजी**
सर्वपक्षीय शिया परिषदेचे अध्यक्ष

## जगाच्या शांततेला आव्हान

ज्या दुर्दैवी माणसानें हें पाप केलें त्यानें जगाच्या शांततेला आव्हान दिलें आहे महात्मा गांधी—जगातला हा सर्वश्रेष्ठ पुरुष शांतता व ऐक्य यांचा आधारस्तंभ होता हें पापी कृत्य जग केव्हाही विसरणार नाहीं. व ज्यांनीं तें केलें त्याचा नेहमीच तिरस्कार करील गांधीजींचें शांतता व ऐक्याचें जीवितकार्य चालू ठेवणें हें आम्हा—हिंदु, मुस्लीम, शीख आणि साऱ्याच हिंदी लोकांचें कर्तव्य आहे

**मौलाना हिफझुल रहमान**
जमियत उल उलेमाचे जनरल सेक्रेटरी

## जग अंधारमय झालें

सार्वकालातील सर्वश्रेष्ठ पुरुष मरण पावला आहे. आणि तें मरण हुतात्म्याचें आहे. आमच्यापैकीं ज्याचे त्यांच्याशीं वैयक्तिक संबंध होते त्यांना जग उजाड आणि अंधकारमय भासेल. पण त्यांनीं जी दैवी प्रकाशाची ज्योत पाजळली ती अनंत कालपर्यंत अधिकाधिक उज्वलतेने जळत राहील हें मात्र आम्ही विसरूं शकत नाहीं.

**सरदार शार्दूलसिंग कवीश्वर**
भारतीय फॉर्वर्ड ब्लॉकचे अध्यक्ष.

## राष्ट्र पोरकें झालें

राष्ट्रपित्याच्या नीच खुनाची भीषण वार्ता ऐकून मन हादरून गेले. या कृत्याचा निषेध करण्यास शब्द नाहीत. राष्ट्र पोरकें झाले आहे. भविष्यात काय आहे ते एका देवाला माहीत. महात्माजी गेले. असे पुन्हा केव्हा निर्माण होतील ?

**शरच्चंद्र बोस**

## ध्येयसिद्धीच्या समयीं पतन

एका मारेकऱ्याच्या विश्वासघातकी गोळ्यांना बळी पडलेल्या महात्मा गांधींना हिंदी कॉम्युनिस्ट पक्ष शेवटचा प्रणाम करीत आहे. हिंदु-मुस्लीमांच्या एकीसाठीं आपल्या पद्धतीप्रमाणें त्यांनीं आयुष्यभर दृढनिश्चयानें आणि प्राण धोक्यात घालून प्रयत्न केला, आणि शेवटीं ध्येयसिद्धीच्या समयीच ते पडले.

**पी. सी. जोशी**
हिंदी कॉम्युनिस्ट पक्षाचे सरचिटणीस

## हिंदु-मुसलिम ऐक्याचा प्रेषित

एका हिंदु प्रतिगामी इसमाच्या हातून महात्मा गांधींची हत्या झाल्यामुळे भारतातील शांततेवर अत्यंत मोठा आघात झाला आहे. हिंदी जनतेच्या शत्रूंनी आज हिंदु-मुस्लीम यादवीला पोषक होईल असें अतिशय कटु वातावरण निर्माण करण्याचे प्रयत्न चालविले आहेत. अशा वेळीं हिंदु-मुस्लीम ऐक्याचा प्रेषित नाहींसा झाल्यामुळें लोकसत्तावादी शक्तींवर फार मोठी जबाबदारी पडली आहे. परकी साम्राज्यवाद व अंतर्गत प्रतिगामी गटाला तोंड देण्यासाठीं कामकरी वर्गाच्या नेतृत्वाखालीं जनतेची संयुक्त आघाडी उघडण्याची ही महान् जबाबदारी आहे.

**कॉ. एस. ए. डांगे**
ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेसचे अध्यक्ष

## पुरोगामी शक्तींना स्फूर्ति

महात्मा गांधी हिंदी राजकीय रंगभूमीवरून अशा वेळीं अदृश्य झाले कीं ज्या वेळीं त्यांच्या जातीयता व लष्करशाही-विरोधी भूमिकेमुळें राष्ट्रांतील साऱ्या पुरोगामी व लोकशाहीवादी शक्तींना स्फूर्ति मिळाली असती.

**रॅडिकल डेमॉक्रॅटिक पार्टीचा ठराव.**

## शीखांचा वाली

अल्पसंख्याकांचा-विशेषत शीखांचा वाली-महात्मा गांधी यांच्या मृत्यूनें शीख पंथाला फार दु:ख होत आहे. त्यांचे मर्त्य शरीर जरी काळानें क्रूरपणें नेलें तरी त्यांचा आत्मा आमच्या हृदयांत अमर आहे.

**ग्यानी कर्तारसिंग**
शिरोमणी अकाली दलाचे अध्यक्ष.

# कांहीं संस्था व पुढारी

## एकाकी आवाज

झगड्यांनीं जीर्ण झालेल्या, कडवटपणा, संशय आणि द्वेष यांनीं कांठोकांठ भरलेल्या या जगांत महात्मा गांधींचा एकाकी आवाज उठत होता. त्यांची शिकवण म्हणजे जगाला सद्बुद्धी, प्रेम व बंधुभाव यांचा रस्ता दाखविणारा उज्वल दीपस्तंभ होता.

**फ्रँक अँथनी**
ऑल इंडिया ॲंग्लो इंडियन ॲसोसिएशनचे अध्यक्ष

## हरिजनांचा उद्धारक

आपला उद्धारक गेल्यानें हिंदुस्थानांतील हरिजनांना धक्का बसला आहे. आम्ही पोरके झालों आहों

**भगत अमीनचंद**
भारतीय हरिजन लीगचे जनरल सेक्रेटरी

## दलितांचा वाली

महात्मा गांधींच्या मृत्यूनें गरिबांच्या आणि दलितांच्या श्रेष्ठ कैवाऱ्यास राष्ट्र मुकलें आहे

**सर शापूरजी बिलिमोरिया**
मुंबईच्या पारशी पंचायतीचे अध्यक्ष.

## इंग्रजांचे मित्र

महात्मा गांधी हे जसे हिंदी जनतेचे तसे इंग्रजांचेही मित्र होते. इंग्लीश सत्तेविरुद्ध त्यांनीं लढा केला परंतु त्यांनीं इंग्रजांचा द्वेष केला नाहीं. कितीतरी व्हॉईसरॉयांना त्यांनीं आपले स्नेही मानलें, इतकेंच नव्हे तर कित्येक इंग्रज स्त्री-पुरुष त्यांचे अत्यंत जिव्हाळ्याचे मित्र होते आपल्या अडीअडचणींच्या प्रसंगीं ते गांधीजींकडे सल्लामसलतीची याचना करीत त्यांना 'बापू' या नावानें हाक मारण्यास त्यांना प्रेम वाटे

**होरेस जी. अलेक्झांडर**
सोसायटी ऑफ फ्रेंड्स (क्वेकर) चे अध्यक्ष

## मानववंशाच्या इतिहासांतील काळाकुट्ट क्षण

हिंदी राष्ट्राच्या आणि मानववंशाच्या इतिहासांतील हा भयंकर काळाकुट्ट क्षण आहे. गांधीजींच्या जीविताला आणि बलिदानाला जर काहीं अर्थ असेल तर आमच्या मनांतील द्वेषभावना काढून टाकूं या.

गांधींसारख्या संतांना मरण नसते. मानवी हृदयांत त्यांची मूर्ति अनंत कालपर्यंत विराजित झालेली असते. सर्व सामर्थ्य एकवटून एकजुटीनें त्यांचीं तत्त्वें अमलांत आणण्याचा प्रयत्न करणे ही या क्षणाची गरज आहे. युगायुगांतील महापुरुषाचे हेंच महान् स्मारक.

**पी. ए. वाडिया**
फ्रीडम ग्रुपचे अध्यक्ष.

## अहिंसेच्या वेदीवर जीवित-समर्पण

महात्मा गांधी हुतात्म्याचे मरण मेले आहेत अहिंसेच्या वेदीवर त्यांना आपलें जीवित समर्पण केले आपण मनोभावे प्रार्थना करूं या की हे अहिंसेचं तत्व अंतीं विजयी होईल व लवकरच हिंदुस्थानात ऐक्य प्रस्थापित करील

**सर बी पी सिंगरॉय**
नॅशनल लिबरेशन ऑफ इंडियाचे व
बंगाल कायदेमंडळाचे माजी अध्यक्ष

## राष्ट्राचा आत्मा

गांधीजींच्या रूपानें राष्ट्राचा आत्मा निघून गेला आहे. हिंदुस्थानांतील प्रत्येक नागरिकाने सहकार्य करून येऊं घातलेल्या आणीबाणीच्या प्रसंगाला तोंड दिलें पाहिजे आणि अशा रीतीनें राष्ट्राचें आणि राष्ट्राच्या आत्म्याचें रक्षण केलें पाहिजे

**एम एल डहाणूकर**
मुंबईचे शेरीफ

## मुस्लीम जगाचा परम मित्र

या खुनी इसमानें राष्ट्राची इभ्रत कमी केली मानवजातीचा महान नेता, राजकारणाला अध्यात्मवादाचा रंग देणारा, उच्च चारित्र्याचा पुरुष आधींच स्वर्लोकांत गेलेल्या बांधवांना भेटायला अदृश्य जीवसृष्टींत निघून गेला आहे. ज्या वेळीं आम्हाला त्याची गरज होती, तो आपला परम मित्र आहे ही गोष्ट नुकतीच कुठें मुस्लीम जगाला पटूं लागली होती, ज्या वेळीं अखंड हिंदुस्थानला त्याचा शहाणपणा व सल्ला–मसलत मिळण्याची संधि आली होती अशा वेळीं भविष्यकालीन आशा निर्माण करणारें हें अलौकिक चारित्र्य एका नीच मारेकऱ्यानें नष्ट केलें आहे

**एस. ए. शफी महमद**
मद्रासचे शेरीफ

## हादरून सोडणारी बातमी

बातमी मन हादरून सोडणारी आहे. यावेळी मला इतका धक्का बसत आहे की महात्मा गांधीच्या मृत्यूची जगांत प्रतिक्रिया होईल यापेक्षा अधिक काही मला सांगताच येत नाहीं

युसुफ दादू
ट्रान्सवाआल पासिव्ह रेझिस्टन्स कौंसिलचे अध्यक्ष

## मानवजातीचा सर्वश्रेष्ठ सुपुत्र

मानवजातीचा श्रेष्ठ सुपुत्र गेल्याबद्दल हिंदी जनतेबरोबर आम्हीहि दु:खात चूर होऊन गेलों आहों.

डॉ. जी. एम. नायकर
नाताळ हिंदी कॉंग्रेसचे अध्यक्ष

## काळाकुट्ट काळोख

काळ्याकुट्ट काळोखात निष्ठेनें उभे रहा. वाट पहा प्रकाश आहेच तो वाट दाखवील. विजय झाल्याखेरीज रहाणार नाहीं.

बाबू अरविंद घोष

## ख्रिस्त व गांधी भाऊ भाऊ

महात्म्याच्या नीच हत्येनें ते व येशू ख्रिस्त याच्यामधील जीवनकार्यातील साम्यानें कळस गाठला आहे. हौतात्म्यांत ते दोघेही बंधु आहेत.

मु. रा. जयकर

## उदात्ततम पुरुष

उदात्ततम पुरुष, श्रेष्ठतम देशभक्त आणि हिंदी स्वातंत्र्याचे जनक महात्मा गांधी यांनीं हिंदी ऐक्यासाठीं आत्मबलिदान केलें आहे. मला आशा आहे कीं मागें राहिलेले कॉंग्रेसजन त्याना आणि त्याच्या परंपरेला शोभेल असें वर्तन करतील.

सर तेजबहादुर सप्रू

## पृथ्वीचा आधार

पृथ्वीचा आधार जणूं उन्मळून पाडला आहे असा मला भास होतो. दलितांच्या यातना आतां कोण कमी करणार ? त्यांचे अश्रू कोण पुसणार ?

रड. भारता, रड. ऊर फुटेपर्यंत रड. कारण सत्य, न्याय व मानवतेचं उत्कट प्रेम याचा प्रकाश फाकणारा दीप मालवला गेला आहे.

आपण काय करतों हें ते पाहात असतील याबद्दल मला खात्री आहे याची शिकवण आपण आमच्या भांबावलेल्या व निराश मनावर बिंबवून घऊया. शांति आणि प्रेम हीं त्यांचीं अत्युच्च तत्वे आचरणात आणण्याचा प्रयत्न करूंया. आणि हिंदु-मुस्लीम ऐक्याचें त्यांचें प्रिय स्वप्न साकार होईल, याची खटपट करूंया

एच. एस. सुऱ्हावर्दी

## जग अनाथ झालें

जगात कधींही झाली नाहीं अशा एका विभूतीविरुद्ध कुणी हात उचलील ही कल्पनाच मला करवत नाहीं. अति बलाढ्य आत्मशक्ति लोपली आहे आणि हिंदुस्थान व जग अनाथ झालें आहे.

• सर एच पी. मोदी

## मानववंशाचे जनक

महात्माजी आणि येशू ख्रिस्त या दोघांच्याही मरणात फार साम्य आहे महात्माजी उच्चतम ध्येयांसाठीं जगले आणि मेले. ख्रिस्ताप्रमाणें त्यांना शुकवारीं मृत्यू यावा ही साधी योगायोगाची गोष्ट नव्हे. महात्माजी केवळ हिंदी राष्ट्राचे पिताजी नव्हते, ते मानववंशाचे जनक होते.

व्ही. के. जॉन, मद्रास कौन्सिलचे सभासद

# संस्थानें

## तत्वज्ञानाचा वारसा ठेवला

या आणीबाणीच्या वेळीं आमच्या राष्ट्रावर ओढवलेली ही आपत्ति भीषण आहे. त्याचा सात्विक सल्ला आणि शहाणपणाचे मार्गदर्शन याचा लाभ यापुढे आम्हाला मिळणार नाहीं. परंतु या हुतात्मा-संताने ज्या तत्वज्ञानाचा वारसा आम्हाला मागें ठेवला आहे तो अमोल आहे

म्हैसूरचे महाराज

## बालकांना यातना

राष्ट्राचे पिताजी आम्हाला अंतरले आहेत. या मर्मान्त्या बालकांना जितक्या यातना होतील तितक्या दुसऱ्या कुणालाही होणार नाहींत.

महात्माजी हे जगाचे उद्धारक होते. या हुतात्मा-संतानें मरणानें देखील आपल्या जीवनातील शिकवण अधिक दृढ केली आहे.

**सर रामस्वामी मुदलीयार**, म्हैसूरचे मुख्य प्रधान

## जगाचें स्फूर्तिस्थान

जगाचें विशाल स्फूर्तिस्थान नष्ट झाल्यामुळे त्याचे फार मोठे नुकसान झालें आहे. गांधीजी गेले, परंतु ज्या श्रेष्ठ आणि उदात्त तत्त्वासाठीं त्यांनीं प्राणार्पण केलें तीं तत्त्वें अमर आहेत.

**मीर लायक अली**, निजामचे मुख्य प्रधान

## मानवतेविरुद्ध गुन्हा

आमच्या दुर्दैवी राष्ट्राच्या इतिहासात हा दिवस फार मोठा शोकदिन म्हणून नमूद केला जाईल. हिंदुस्थानच्या आणि जगाच्या प्रिय महापुरुषावर झालेला भेकड हल्ला म्हणजे मानवतेविरुद्ध करण्यात आलेला गुन्हा होय. खुनी इसमाच्या गोळीनें आमच्या इतिहासाचीं पानें एका संताच्या रक्तानें माखलीं आहेत. या पापाचें प्रायश्चित्त घ्यायचें झालें तर महात्म्यानें ज्या कार्यासाठीं बलिदान केले त्या कार्याला आम्हीं आमचें जीवन वाहिलें पाहिजे. हिंदुस्थानच्या मनाला खोल जखम झाली आहे.

**नवाब यार जंग बहादूर**
दिल्लीतील निजामाचे एजंट जनरल

## प्रेषितांचें नशीब

साऱ्या प्रेषिताच्या नशिबीं असाच भोग होता. बापूच याला अपवाद कसे होतील? जिवंत असताना ते मोठे आणि प्रकाशमान तर होतेच. पण मृत्यू नंतर ते अधिक मोठे आणि अधिक प्रकाशमान झाले. काश्मिरी जनता आता-पर्यंत जवळ जवळ त्याच्याच उदात्त सल्ल्याप्रमाणें वागली आहे.

**गुलाम महमद बक्षी**
काश्मीर संस्थानचे उपकारभार प्रमुख

## हिंदी पुनरुत्थानाचा व प्रगतीचा इतिहास

महात्माजींचें चरित्र म्हणजे भारताच्या पुनरुत्थानाचा व प्रगतीचा इतिहास आपल्या ध्येयाशीं एकनिष्ठा, कर्तव्य व त्याग यानी एक मानवी जीव किती उच्चतम पायरीवर जाऊं शकतो याचें महात्मा गांधी हें मूर्तिमंत उदाहरण आहे. ते हिमालयाप्रमाणे उन्नत व गूढ, गंगेप्रमाणें पवित्र, सूर्याप्रमाणें प्रकाशमान, ध्रुवताऱ्याप्रमाणें अचल, सागराप्रमाणे सखोल आणि पृथ्वीप्रमाणे विशाल होते

**ग्वाल्हेरचे महाराज**

## महान् हिंदु

जर हिंदूंना थोडासा स्वाभिमान व इभ्रत असेल तर आपले उर्वरित आयुष्य त्या महान् हिंदूच्या शिकवणीला वाहून घेणें हें त्याचे या समर्थाचे कर्तव्य होय. आमचे या जगातले अस्तित्व सार्थकीं लावण्याचा हा एकच एक मार्ग आहे. पंडित नेहरूंना मी आश्वासन देतों कीं माझ्या संस्थानात एकाही मुसलमानाच्या केसाला धक्का लागला तर गुन्हेगाराला निर्दयपणें शासन करण्यांत येइल.

**कोचीनचे महाराज**

## विरक्त व त्यागी जीवन

बाहेरच्या जगाला महात्मा गांधी म्हणजे भारताची संस्कृति व आत्मा यांचे प्रतिनिधी होते. जगाच्या इतिहासांत एकाद्या राष्ट्राचें नशीब एका माणसाशी जोडलेलें क्वचित्च आढळून येईल. फक्त हिंदुस्थानांतच ही गोष्ट घडली. कोट्यवधि हिंदी जनतेवर त्यांच्याइतका दुसऱ्या कुणाही पुढाऱ्याचा प्रभाव नव्हता. आपल्या या वजनाचा उपयोग आपल्या विरक्त व त्यागी जीवनात त्यांनीं राष्ट्रस्वातंत्र्य व राष्ट्रोत्थापन यांच्यासाठीं केला. हुतात्म्याच्या बलिदानानें हिंदुस्थानांतील विरोधी गटांत समझोता घडून येवो अशी मी मनःपूर्वक आशा करतों.

**सर. सी. पी. रामस्वामी अय्यर**
त्रावणकोरचे माजी मुख्य प्रधान

## नेतृत्वाची गरज होती

कधींही नव्हती इतकी आज आम्हाला महात्माजींच्या मार्गदर्शनाची व नेतृत्वाची गरज होती त्यांच्या वधाची वार्ता ऐकून आम्ही दुखात व वेदनांत बुडून गेलों आहो

भोपाळचे नवाब

## कर्मयोगी

या कर्मयोग्याच्या स्मृतीला मोठ्यात मोठी श्रद्धांजलि अर्पण करावयाची म्हणजे त्यांनी ज्या जातीय ऐक्यासाठीं आत्मबलिदान केले त्या ध्येयास वाहून घेण होय. आपण सर्वजण बंधु-भगिनी म्हणून वागण्याचा प्रयत्न करूंया म्हणजे गेल्या कांही महिन्यात कलंकित झालेले देशाचे नांव लवकरच उज्ज्वल होईल

बिकानेरचे महाराज

## हिंदुस्थानचा आत्मा

महात्मा गांधींच्या मृत्यूने हिंदुस्थान आपला आत्मा गमावून बसला आहे महात्माजी हे साधुपुरुष होते. संकटांनी भरलेल्या या जगांत आम्ही गरीब बिचारे मर्त्य मानव ते गेल्यामुळे त्यांच्या मार्गदर्शनाला मुकलों आहों. त्यांचीं ध्येयें आचरणांत आणण्याचा प्रयत्न करून महात्माजींची स्मृति माझ्या देशबांधवांनी अमर करावी अशी माझी प्रार्थना आहे.

छत्तारीचे नवाब

## स्वर्गांत आणखी एका देवदूताची भर पडली

मानवजातीला शांतता आणि सद्भावाचा संदेश देणारा प्रेषित दैवाच्या क्रूर चेष्टिताला बळी पडावा ही महाभयानक शोकांतिका आहे पृथ्वीवर एक देवदूत कमी झाला तरी स्वर्गांत एकाची भर पडली असा विचार करून मनाचे समाधान करण्याचा प्रयत्न करूं.

रामपूरचे नवाब

## दिव्य प्रकाश निमाला

जगावर अत्यंत मोठी आपत्ति कोसळल्यावर जें वाटेल तसें मला वाटत आहे ज्यांना हृदय आहे, आशा आकांक्षा आहेत, त्या सर्व माणसांचा गांधीजींवर हक्क होता, दिव्य प्रकाश जणुं लुप्त झाला आहे. परंतु त्यांची स्मृति अमर आहे

एम्. बारॉं, फ्रेंच हिंदुस्थानचे गव्हर्नर

# राष्ट्रसंघ

## गांधींच्या तत्त्वांवर राष्ट्रसंघाची स्थापना

उदात्त ध्येयाशीं अव्यभिचारी निष्ठा कशी राखावी याचा गांधींनी जगाला धडा घालून दिला

ज्या उदार आणि उदात्त ध्येयाचे त्यांनीं व्रत घेतले तीं **सफळ व्हावीं** म्हणून ते अनेकदा आपले प्राण अर्पण करण्यास सिद्ध झाले त्याच्याबद्दल आम्हाला आदर वाटे तो अशासाठीं कीं [illegible] आणि बंधुभाव याचे ते अधिष्ठान होते या गोष्टीमुळेंच आमच्या वादविवादात त्यांच्या नावाचा पुष्कळदा उल्लेख होई जगात शांतता नांदविण्याच्या आमच्या प्रयत्नात ते सहभागी आहेत असेंच आम्हांला वाटे

गांधींचा मृत्यु घडला म्हणून त्यांच्या सत्कार्याचा शेवट होणार नाहीं. ते इहलोक सोडून गेले तरी उदात्ततेचे प्रतीक म्हणून राहातील

त्यांच्या जीवनाचे आणि शिकवणुकीचे दूरगामी परिणाम त्यांच्या मरणानंतरही चालूच राहातील त्यांच्या स्मृतीशीं निष्ठावंत राहाणारे हिंदुस्थानातले व इतर राष्ट्रांतील लोक समन्वयाच्या व अहिंसेच्या तत्त्वांचा प्रसार करतील याच तत्त्वावर राष्ट्रसंघाची प्रतिष्ठापना झाली आहे.

**एम. फर्नांद व्हॅन लँजेनहोव्ह**
राष्ट्रसंघाच्या सुरक्षा मंडळाचे अध्यक्ष व बेल्जमचे प्रतिनिधी

## शांतीची मूर्ति

महात्मा गांधींचा दुःखद अंत ओढवल्याने मानवजातीची भरून न येऊ शकण्यासारखी हानी झाली आहे. जगातील लोकांपुढे जे गंभीर प्रश्न उभे आहेत त्यांना तोंड देण्यासाठीं त्यांच्या आध्यात्मिक नेतृत्वाची आजच्या क्षणी अत्यंत गरज होती

ते शांतीची मूर्ति होते राष्ट्रसंघाची उच्च तत्त्वें त्यांनी सोदाहरण दाखविली होती. ज्या तत्वांसाठीं त्यांनी जीवन वेचले त्याचा प्रसार होण्याच्या कामीं त्यांचे आत्मबलिदान उपकारक होवो.

**जनरल प्राइस**, राष्ट्रसंघाचे चिटणीस

## उदात्ततेचें प्रतीक

गांधींचे सत्कार्य त्यांच्या मृत्यूने थांबणार नाही. जिवंतपणीं जसे ते उदात्ततेचें प्रतीक समजले जात तसेच त्यांच्या मृत्यूनंतरही समजले जातील. त्यांच्या देशातील आणि जगांतील ज्या लोकांनी त्यांची स्मृती उजळ केली आहे ते अहिंसा व ऐक्य या उच्च ध्येयांशी एकनिष्ठ रहातील.

**फिलिप नोएल बेकर**
ब्रिटनचे कॉमनवेल्थ मंत्री व राष्ट्रसंघांतील प्रतिनिधि

## कमानीची आधारवीट निखळली !

गांधीजींनीं प्रबुद्ध हिंदु धर्मातील अति उदात्त ध्येयें चालू युगांत साकार करून दाखविलीं. त्यांच्या दुःखद मृत्यूनें जितकी पाकिस्तानची व हिंदुस्थानची शोचनीय हानि झाली आहे तिच्याहून अधिक शांतिकार्याच्या दृष्टीनें अखिल जगाची झाली आहे.

कोट्यवधि लोक त्यांच्यावर प्रेम करीत. आणि ज्यांनी त्यांचें नुसतें नांवच ऐकलें ते त्यांना आदरणीय मानीत. त्यांना दुःख देण्याची कुणी इच्छा करील ह्या कल्पनेचा बोधच मला होत नाहीं. एका खुन्याच्या गोळीला ते बळी पडावे हा विरोधाभास आहे. ज्या कमानीवर इमारतीचा भार अवलंबून होता त्या कमानीच्या केंद्रस्थानीं असलेली वीट म्हणजे गांधीजी, याची जाणीव झाली म्हणजे या मर्मभेदक दुःखातिकेची तीव्रता अधिकच वाटूं लागते.

एका भेकड हातानें ही आधारवीट निखळवली आहे. या अनर्थाची परिणति कशांत होईल याचें मोजमाप करणें कठीण आहे.

ज्या ध्येयांना गांधीजींनी आपलें जीवन वाहिलें तीं ध्येयें या अपूर्व त्यागानें त्यांनीं अधिक लवकर साध्य केलीं असतील, एवढेंच आम्ही म्हणूं, आणि तशी प्रार्थना करूं.

**सर महमद झाफरुल्लाखान**
पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री व पाकिस्तानी शिष्टमंडळाचे प्रमुख.

## आशियाच्या ज्ञानाचा व उदात्ततेचा प्रतिनिधी

महात्मा गांधींच्या मृत्यूनें आशिया आपल्या फार मोठ्या साधुपुरुषाला मुकला आहे. या पुरातन खंडाची उदात्तता आणि ज्ञान याचा प्रतिनिधी म्हणून फक्त त्यांच्याकडेच बोट दाखविता येईल.

**टी. एफ्. त्सियांग**, चीनचे प्रतिनिधि.

## प्रतिगामी शक्तींना मोकळें रान

अखंड हिंदुस्थानसाठीं ते ठामपणें उभे होते. त्याच्या फाळणीला जेव्हां त्यांना मान्यता द्यावी लागली त्यावेळीं त्यांना जे दु.ख झाले तसें इतर कोणत्याही वेळी झालें नसेल. पण ही गोष्ट होऊन गेल्यावरही त्यांनी या दोन राष्ट्रांत प्रेमसंबंध वाढावे व जातीय ऐक्य व्हावें म्हणून खटपट केली.

जीवनांत वाईटाऐवजीं चांगले आणण्याचे प्रयत्न करणे हा त्यांचा धर्म होता. हें धर्मकृत्य करीत असतांनाच त्यांना बलिदान करावें लागलें.

महात्मा गांधींच्या मृत्यूने जगाला जो धक्का बसला आहे त्यातून तें केव्हां सावरेल तें मी सांगूं शकत नाहीं. त्याचा मृत्यू म्हणजे प्रतिगामी शक्तींना मोकळें रान. परंतु मला खात्री वाटते या अंधारातूनही हिंदुस्थान डोकें वर काढील. हिंदुस्थानच्या भूमींत नेतृत्वाची अशी एक शक्ति आहे कीं जी या चिखलांतूनही भारताचा उद्धार करील.

अशा रीतीनें मृत्यू येण्यापेक्षा महातमा गाधीनीं उपवास थांबविला नसता तर बरें झालें असतें.

**गोपाळस्वामी अय्यंगार**
हिंदी शिष्टमंडळाचे प्रमुख.

## हिंदी इतिहासांत छाप

हिंदुस्थानचे अलौकिक पुढारी या दृष्टीनें हिंदुस्थानच्या इतिहासांत गांधींनी निःसंशयपणें आपली छाप ठेवून दिली आहे. स्वातंत्र्यासाठीं हिंदी जनतेनें जो दीर्घकाळ लढा केला त्याच्याशीं गांधींचें नांव नेहमींच निगडित केलें जाईल.

**आंद्रे ग्रोमिको**, सोविएट प्रतिनिधि

## गांधींच्या मृत्यूनें सार्वभौमत्वाचा लढा थांबूं नये

मला अशी आशा आहे आणि माझा असा समज आहे कीं बलिष्ट व स्थिर सरकार आणि स्वत चें सार्वभौमत्व निर्माण करण्याचें हिंदी जनतेचें जे लढ्याचें कार्य चालू आहे तें ग.धींच्या मृत्यूने थाबणार नाहीं.

**एम् व्हासिली तारासेंको,**
युक्रेनचे प्रतिनिधि

## न्यायाला जीवन वाहिलेले हुतात्मे

गांधी हे आपल्या कालातले एक मोठे पुढारी होते आपल्या चरित्राने व शिकवणीनें आध्यात्मिक शक्ति केवढी मोठी असते हें त्यांनीं सिद्ध करुन दाखविलें. न्यायाला जीवन वाहिलेले ते एक हुतात्मे होते त्याचीं तत्वें जर आम्ही मानलीं तर आमच्या कार्याच्या अंतिम यशाबद्दल आमच्यात आत्म-विश्वास निर्माण होईल. जगातील शाततावादी शक्तींचा विजय होवो अशी आपण प्रार्थना करूं या.

**डॉ. जुझे आर्स,** आर्जेंटिनाचे प्रतिनिधि

## शांतीचा दुसरा प्रेषित

शांतीच्या पहिल्या प्रेषिताप्रमाणेंच याही शातीच्या प्रेषिताला मृत्यु यावा हें पाहून जग हादरून गेले आहे. त्यांनी पेरलेलीं बीजे लोकाच्या हृदयात अंकुरित होतील आणि राष्ट्रसंघाच्या जाहीरनाम्यातील हेतु सिद्ध करण्याच्या कामीं तीं सहायकारी होतील अशी आपण आशा करूं या.

**फारीस एल खुरी,** सीरियाचे प्रतिनिधि

## उदात्त जीवन मृत्यूनें उज्ज्वल

गांधींच्या रुपानें एक महान आणि सुरुचिर पुरुष निघून गेला आहे गांधींना न ओळखणारा किंवा त्यांच्या नावाकडे भक्तिभावानें न पाहणारा एकही फ्रेंचमन नसेल. आपल्या ध्येयासाठीं त्यानीं आत्मदान केलें आणि हुतात्म्याचें मरण स्वीकारून आपलें उदात्त जीवन उज्ज्वल केलें.

**एम्. गाय द ला तुर्नेय**
फ्रान्सचे प्रतिनिधि

# ब्रिटन व ब्रिटीश कॉमनवेल्थ

## मानवजातीचें नुकसान

( हिंदचे गव्हर्नर जनरल लॉर्ड माऊंटबॅटननां पाठविलेला संदेश )

गांधीच्या मृत्यूनें मला व राणीसाहेबाना फार मोठा धक्का बसला. हिंदी जनतेला कळवा कीं त्यांचें–आणि मानवजातीचें देखील जे कधींही भरून न येऊं शकणारें नुकसान झाले आहे त्याबद्दल आम्हांला मनःपूर्वक सहानुभूति वाटते

**हिज मॅजेस्टी ब्रिटनचे राजे सहावे जॉर्ज**

## नैतिक व आत्मिक नेतृत्व

आपल्या राष्ट्राच्या इतिहासांत महात्मा गांधींइतकी कामगिरी दुसऱ्या कोणीही केली नाहीं. आपल्या दीर्घ जीवनांत त्यांनी शांततेसाठीं प्रयत्न केले आणि हिंसेचा निषेध केला. जगातील प्रत्येक राष्ट्रांतल्या विविध क्षेत्रांतल्या असंख्य लोकांना त्यांच्या मृत्यूमुळें दुःख झालें आहे. आजच्या भांबावलेल्या व संकटांनी त्रस्त झालेल्या युगात त्यांचें नैतिक व आत्मिक नेतृत्व प्रेरक ठरले होतें.

आपल्या जीवनाच्या शेवटच्या कांहीं महिन्यांत जातीय कटुता नाहींशी करण्यांत व साऱ्या हिंदी जनतेचा कल्याणाचा मार्ग चोखळण्यांत ते यशस्वी झाले होते. लोकांना शांततेच्या मार्गानें जाण्यास त्यांची नैतिक शक्ति यापुढेंही प्रवृत्त करो अशी ब्रिटीश सरकारची मनःपूर्वक इच्छा आहे.

**ब्रिटनचें सरकार**

## तपोनिष्ठाचें जीवन

महात्मा गांधी हे आमच्या युगातील लोकोत्तर पुरुष होते. परतु त्यांचें जीवन मात्र इतिहासाच्या एका निराळया कालखंडांतलें होतें. सर्वसंगपरित्याग केलेल्या तपोनिष्ठाचें जीवन ते जगत होते. कोट्यवधि हिंदी जनता त्यांना दैवी साधुपुरुष म्हणून मानी. हिंद्वेतर जनतेवरही त्यांचें वजन होतें.

गेल्या पावशतकात ज्या ज्या वेळीं हिंदुस्थानचा प्रश्न निघाला त्या त्या वेळी या एका माणसाला फार मोठें महत्त्व आलें होते. हिन्दी जनतेच्या स्वातंत्र्यविषयक आशा–आकाक्षाचे ते एकमेव उद्गाते ठरले होते पण असें असूनही ते फक्त एक देशभक्त नव्हते. परकी सत्तेच्या विरोधाबरोबर पूर्वेवर पडलेल्या पश्चिमेच्या प्रभावालाही ते विरोध करीत. पश्चिमेच्या भौतिकवादा-विरुद्ध त्यानीं बंड पुकारलें होते. आणि समाजाला साध्या राहाणीच्या तत्त्वाकडे नेण्याचे त्याचे प्रयत्न चालले होते.

परंतु त्याचे सर्वांत महत्त्वाचे तत्त्व म्हणजे अहिंसा. भौतिक शक्तींविरुद्ध नि:शस्त्र प्रतिकाराने विजय मिळवितां येतो या तत्त्वावर त्याचा पूर्ण विश्वास होता. आपलीं ध्येये गाठताना त्यानीं जो प्रामाणिकपणा आणि जी निष्ठा व्यक्त केली ती संशयातीत आहे.

अन्यायाविरुद्ध झगडतानाच गरीबासाठी–हिंदुस्थानांतील दलित जातीं-साठींही ते झगडले आहेत.

शाति आणि बंधुभाव याच्यासाठी तळमळून बोलणारा आवाज एका खुनी मारेकऱ्याच्या हातानें बंद पडला आहे परंतु मला खात्री आहे कीं त्यांचा आत्मा आपल्या देशबांधवाना शातता व समन्वय साधण्यासाठीं स्फूर्ति देईल.

**क्लिमेंट ॲटली,** ब्रिटनचे मुख्य प्रधान

## आध्यात्मिक नेते

स्वातंत्र्य मिळाल्यापासून जी गंभीर परिस्थिति निर्माण झाली आहे ती नष्ट करण्याच्या कामीं गाधींनीं आपली शक्ति वेंचली. जगापुढील अडचणींचे प्रश्न शाततेनें सुटावे असें ज्याना वाटते त्यांना या शक्तिमान् परंतु शांतिस्वरुप व्यक्तीच्या अंतानें दुःख झालें आहे.

अहिंसेवरील त्यांची श्रद्धा नुसती शब्दांनीं नव्हे तर कृतीनें व आमरण केलेल्या स्वार्थत्यागानें व्यक्त झाली होती.

आमच्या काळातील जगाचे ते [illegible] नेते होते. त्याच्याप्रमाणें ज्यांचा आध्यात्मिक मूल्यावर विश्वास आहे त्याना गांधींच्या मृत्यूनें हताश वाटेल.

**सर स्टॅफोर्ड क्रिप्स**
इंग्लंडचे चान्सेलर ऑफ दि एक्सचेकर

## भयानक प्रसंग

या महाभनयाक प्रसंगीं हिंदुस्थानचें व जगाचें किती नुकसान झाले आहे हें योग्य शब्दांत व्यक्त करण्यास वाणी असमर्थ आहे.

**अर्नेस्ट बेविन**, ब्रिटनचे परराष्ट्र मंत्री.

## महान् आत्मिक शक्ति असलेली विभूति

गांधींचा मृत्यु हें माझे वैयक्तिक नुकसान आहे. तीन आठवड्यांपूर्वी मी त्यांना दिल्लीस भेटलों त्यावेळीं माझ्या मनावर जो उदात्त परिणाम झाला तो मी केव्हाही विसरणार नाहीं. महान् आत्मिक शक्ति असलेल्या एका विभूतीच्या सहवासात आपण आहों असा मला भास झाला

**आर्थर हेंडरसन**, ब्रिटनचे वैमानिक मंत्री

## या शतकांतील लोकोत्तर पुरुष

दरेक शतकात जे फार लोकोत्तर पुरुष होतात त्यांपैकीं एक महात्मा गांधी होते. लोकांना एकत्र आणण्यासाठीं त्यांनीं शक्तीचा उपयोग न करतां आपल्या तत्त्वाप्रमाणें अहिंसावादाचा केला.

**ए. व्ही. अलेक्झांडर**, ब्रिटनचे संरक्षण मंत्री

## नीच गुन्हा

या नीच गुन्ह्यामुळें मला धक्का बसला.

**विन्स्टन चर्चिल**, ब्रिटनचे माजी मुख्य प्रधान

## जागतिक इतिहासाच्या प्रकरणाचा शेवट

**हिंदुस्थान व ब्रिटन यांच्या परस्पर संबंधाबाबत गांधींनी घेतलल्या भूमिकेचें मूल्यमापन फक्त इतिहास करूं शकेल. एक गोष्ट मात्र निश्चितपणें सांगतां येईल कीं हिंदुस्थानांतील ब्रिटिशाची सत्ता नष्ट करण्याच्या कामीं त्यांच्याइतकी कामगिरी दुसऱ्या कुणीही केली नाहीं.**

जगाच्या इतिहासाचें एक मोठें प्रकरण गांधींच्या मृत्यूनें समाप्त झालें आहे. हिंदी जनतेच्या मनांत मात्र गांधी म्हणजे एका नव्या प्रकरणाचा आरंभ हीच कल्पना दृढमूल झाली असेल. हें प्रकरण आरंभीं खळबळकारक असलें तरी पुढें पुढें तें हिंदुस्थानच्या शांततेत व भरभराटींत परिणत होत जाईल अशी आम्ही आशा करतों.

**एल. एस. एमरी**, युद्धकाळांतील भारतमंत्री

## मरणकाळची इच्छा ?

मरतांना त्यांनी एक इच्छा केली असेल ती ही कीं आपल्या मरणाचा सूड घेण्यांत येऊं नये किंवा अधिक रक्तपात व हिंसेसाठीं त्याचा उपयोग करण्यांत येऊं नये. उलट आशियाच्या या उपखंडांतील लोकांच्या ऐक्यासाठीं आपला मृत्यु मार्गदर्शक व्हावा.

**लॉर्ड पेथिक लॉरेन्स**, शेवटचे भारतमंत्री

## असे पुरुष इतिहासांत फार थोडे

इतिहासांत अशा फार थोड्या व्यक्ती आढळतील कीं ज्यांना आपल्या वैयक्तिक चारित्र्याच्या उदाहरणानें आपल्या पिढींतील लोकांच्या विचारांना महत्वाचें वळण लावणे शक्य झालें.

**लॉर्ड हॅलीफॅक्स**, हिंदुस्थानचे माजी व्हाइसरॉय

## ते असे जातील असें मला वाटलें नव्हतें.

गांधींच्या मृत्यूनें हिंदी जनतेच्या ऐक्याची कधींही भरून न येऊं शकणारी हानि झाली आहे. ते असे जातील असें मला वाटलें नव्हतें. वृद्ध झाले असले तरी आणखी बराच काळ ते जिवंत राहातील अशी माझी भावना होती. त्यांची अनुपस्थिति आणि त्यांच्या मृत्यूचा प्रकार यामुळें माझ्या जागीं आलेल्या लॉर्ड माऊंटबॅटनपुढचें कार्य अधिक कठीण होणार आहे.

**लॉर्ड वेव्हेल**, हिंदुस्थानचे माजी व्हाइसरॉय

## हें निसर्गानें घडविलें असतें !

लवकरच जें निसर्गानें घडवून आणलें असतें तें एका मारेकऱ्याच्या क्रूर हातानें घडविलें आहे. हिंदुस्थानपुढें भविष्यकाळांत काय वाढून ठेवलें आहे याचें भविष्य कुणीही वर्तवूं शकत नाहीं.

**लॉर्ड लिनलिथगो,** हिंदुस्थानचे माजी व्हाइसरॉय

## महत्तम विभूति

जग—किंबहुना इतिहास आपल्या महत्तम विभूतीला मुकला आहे. गांधींच्या मारेकऱ्याच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें न चालतां हिंदुस्थाननें गांधींच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे चालावें अशी मी प्रार्थना करतों.

**फेन्नर ब्रॉकवे**
इंग्लंडमधील हिंदुस्थानचे हितैषी

## खरा हुतात्मा

ज्या जातीय ऐक्यासाठीं आणि खऱ्याखुऱ्या स्वातंत्र्यासाठीं गांधीजींनीं जीवित दिलें तें त्यांचें कार्य पुढें चालू राहिलें पाहिजे. हिंदुस्थान—पाकिस्तान-मधील पुढाऱ्यांवर या आणीबाणीच्या प्रसंगीं फार मोठी जबाबदारी पडली आहे. आपसांतील मतभेद मिटवून समान भूमिकेवरून सहकार्य व संपूर्ण स्वातंत्र्य हीं महात्मा गांधींचीं महान् ध्येयें साध्य केलीं पाहिजेत.

म. गांधींनीं आपलें जीवन खऱ्या हुतात्म्याप्रमाणे समर्पण केलें आहे.

**रजनी पाम दत्त**
ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाचे उपाध्यक्ष

## फाळणीचा अपरिहार्य वारसा

गांधींच्या जीवितावर जो अत्याचार झाला त्यानें हिंदुस्थानवर व जगावर क्रूर आघात झाला आहे. जातीयतेशीं दोन हात करतांना एखाद्या हुतात्म्याप्रमाणें गांधी धारातीर्थी पडले आहेत. ही जातीयता म्हणजे त्यांनीच

भविष्य केल्याप्रमाणें गेल्या ऑगस्टमध्यें साम्राज्यशाहीनें केलेल्या फाळणीचा अपरिहार्य वारसा आहे.

जातीय समन्वयाच्या त्याच्या धोरणानें हिंदुस्थानातील कॉम्युनिस्ट धरून साऱ्या पुरोगामी, लोकसत्तावादी शक्तींशी ते अधिक जवळ आले. याची प्रतिक्रिया म्हणजे आत्यंतिक जातीयवादी उजव्या गटात त्याच्याबद्दल निर्माण झालेला द्वेष या आत्यंतिक जातीयवाद्यांच्या वृत्तपत्रातून गांधी–नेहरूंचा खून करण्याची भाषा उघडपणें करण्यात येई आणि याचें कारण इतकेंच कीं, हिंदी राष्ट्रीय चळवळ लोकशाहीप्रधान अजातीय तत्त्वावर चालवावी असें ते म्हणत हें. आजच्या गंभीर आणि आणीबाणीच्या प्रसंगीं हिंदुस्थान व पाकिस्तान या दोन्ही वसाहतींतील हिंदी पुढाऱ्यावर फार मोठी जबाबदारी पडली आहे. हा त्यांच्या परीक्षेचा प्रसंग आहे. त्यानीं एकत्र येऊन सांधण्याचे आणि गांधी-प्रणीत खऱ्याखुऱ्या स्वातंत्र्याचे मार्ग शोधले पाहिजेत.

**ब्रिटीश कॉम्युनिस्ट पार्टीचा ठराव**

## मानवतेचा अंतिम हेतु गांठण्याचा एकच मार्ग

ब्रिटनमधील ज्यू जमातीतर्फे मी हार्दिक दु ख व्यक्त करतो. साधुतुल्य चारित्र्याचे शांततेचे भक्त म्हणून गांधींचें नाव अजरामर होईल.

हिंदुस्थाननेंच नव्हे तर जगानें त्याचीं ध्येयें पाहिलीं. तीं ध्येयें अमलांत आणणें कठीण होते खरें. परंतु विविध वर्णांच्या आणि धर्मांच्या लोकांमधील अविनाशी स्नेह व शांतता हा जो मानवतेचा अंतिम हेतु तो गांठण्यास महात्मा गांधींचा मार्ग हें एकच एक साधन होतें.

**डी. एच. लाझारुस**, ब्रिटनचे ॲक्टिंग चीफ रब्बी

## फार चांगलें होणें धोक्याचें

फार चांगले होणें किती धोक्याचें असतें हें या घटनेवरून दिसून येतें.

**जॉर्ज बर्नार्ड शॉ**

## हिंसेकडून शांतीकडे

मानवजातीला हिंसेकडून शांतीकडे व बंधुभावाकडे नेण्यासाठीं गांधींनी आपलें आयुष्य वाहिलें धर्मवेडानें आणि द्वेषानें त्यांना हुतात्मे ठरविले.

**डॉ फिशर**, कँटरबरीचे आर्चबिशप

## धर्मोपदेशकांत प्रकाशाचा किरण

आमच्या काळातील धर्मोपदेशकाच्या मनात गांधींनी एक प्रकाशाचा किरण टाकला कारण या हिंसेच्या युगात त्यांनी अहिंसेचे सामर्थ्य प्रत्ययाला आणून दिलें. त्यांच्यात कमालीची धृष्टता, संपूर्ण प्रामाणिकता आणि विलक्षण मानवता होती

**डॉ इ. डब्ल्यू बार्न्स**, बर्मिंगहॅमचे बिशप

## ईश्वराचीं लेकरें कधींही मरत नाहींत

महात्मा गांधी हे मानवजातीचे फार मोठे मित्र होते. १९३१ मध्यें गोलमेज परिषदेला आले असतांना त्यांच्या यजमानत्वाचा मान मला मिळाला होता. त्या वेळच्या त्यांच्या जीवनातील काहीशा कडवट काळांत कँटरबरीनें त्यांचें आतिथ्य केलें याचा मला अभिमान वाटतो

गांधी मेले नाहींत गांधी अमर आहेत ईश्वराच्या लेकरांना कधींही मृत्यू नसतो.

**डॉ. ह्यूलेट जॉन्सन**, कँटरबरीचे डीन.

## माणसांचे राजे

माझ्या काळांतले गांधी हे एक थोर पुरुष होते. माझीं त्यांचीं मतें व कार्यपद्धति जुळती नसली तरी आमच्या तीस वर्षांच्या परिचयानें त्यांच्याबद्दल वाटणारा उत्कट आदर दिवसेंदिवस वाढत गेला.

गांधींनी आजच्या जगांत अतुलनीय नांव मागे ठेवलें आहे. मानवजातीचे ते अलौकिक पुढारी होते.

माणसांचे राजे निजधामाला गेले आहेत !

**फिल्ड मार्शल स्मट्स**
दक्षिण आफ्रिकेचे प्रधान मंत्री

## आफ्रिकन जनता दुःखी

हिंदी जनतेच्या दुःखदायक हानींत सर्व आफ्रिकन सहभागी आहेत. जगाच्या महान् भूतदयावाद्याच्या मृण्मय अवशेषांपुढें आम्ही जड मनाने मस्तक ठेवतो.

**जोसेफ मायकेल**
सेक्रेटरी लीग ऑफ कलर्ड पिपलस्

## अहिंसेला वाहिलेलें जीवित

जे जीवित अहिंसेला वाहिलेलें होते ते हिंसेनें नष्ट झालेलें ऐकून पराकाष्ठेचा धक्का बसला.

**मॅकेंझी किंग**, कॅनडाचे मुख्य मंत्री

## मानवतेच्या कल्याणासाठीं झटणारे

महात्मा गांधींच्या दुःखद अंताच्या बातमीनें ऑस्ट्रेलियन जनता व सरकार थरारून गेलें. मानवतेच्या कल्याणासाठीं झटणारे व शांततेचे उपासक म्हणून ऑस्ट्रेलियांत दीर्घकालपर्यंत त्याची स्मृति कायम राहील.

**जोसेफ चीफले**, ऑस्ट्रेलियाचे मुख्य प्रधान

# युरोप

## फ्रान्सचा मित्र

गांधींना प्रणाम करून फ्रेंच असेंब्ली फ्रान्सच्या मित्राचा, देशभक्ताचा आणि विशेषेंकरून एका विचारवंताचा सन्मान करीत आहे. प्रेम हें द्वेषापेक्षां श्रेष्ठ आहे हा धडा त्यांच्या उदाहरणानें जगाला मिळाला असेल अशी आम्ही आशा करतों.

**एम. रॉबर्ट शूमन**, फ्रान्सचे मुख्य प्रधान

## महापुरुषाच्या मृत्युशय्येशेजारीं फ्रान्स खडा आहे.

आमच्या युगातील अत्यंत शोककारक बातमी आज जगानें ऐकली सदिच्छेनें आणि त्यागानें द्वेष व महत्त्वाकांक्षा जिंकता येते हे ज्याने थोड्याच दिवसापूर्वी दाखवून दिलें तो आज आम्हाला सोडून गेला आहे एका वेड्या-पीराने त्याना ठार केलें आहे

त्यांचेच लोक त्यान्याबद्दल रडतील असे नव्हे तर बंधुभावावर ज्यांचा विश्वास आहे तेही त्याच्या निधनाबद्दल अश्रू ढाळतील. मानवाचा वर्ण किंवा धर्म याचा विचार न करता त्याच्यावर प्रेमाचा वर्षाव करण्याचे उदाहरण त्यानी घालून दिले. जन्मभर हिंसेशी युद्ध करून शेवटीं हिंसेला बळी पडलेल्या या महापुरुषाच्या मृत्युशय्येशेजारीं आजची रात्र फ्रान्स देश खडा आहे.

**एम् जॉर्ज बिदॉल्त**, फ्रान्सचे परराष्ट्र मंत्री

## शांतीसाठीं शेवटचें बलिदान

आपल्या मरणाचा सूड घेतला जाऊं नये अशीच त्यांची इच्छा असेल. त्यांच्या जीवनाचे अनुकरण करावयाचे तर त्यांचा मृत्यू म्हणजे मानवांतील शांतीसाठीं शेवटचे बलिदान ठरलें पाहिजे.

**एम् लियाँ ब्लुम**, फ्रान्सचे माजी मुख्य मंत्री

## सार्वकालांतील सर्वश्रेष्ठ मानव

गांधी ही अशी एक व्यक्ति होती कीं जिच्या रूपाने त्यांचा धर्म व वर्ण यांची आम्हांला पुरी कल्पना आली. एका वृद्धाच्या उपवासानें माणसांनीं शस्त्रे फेकून द्यावीं अशी घटना जगातल्या दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रांत घडली नसेल. गांधी हे सार्वकालांतील सर्वश्रेष्ठ मानव होते.

**एम्. फ्रांसुआ मॉरिआ**

कादंबरीकार व फ्रेंच ॲकॅडेमीचे सभासद

## हिंदी जनतेचे आध्यात्मिक नेते

गांधी हे शांततेसाठीं झगडणारे महापुरुष आणि हिंदुस्थानांतील कोट्य-वधि लोकांचे आध्यात्मिक नेते होते.

**पोप पायस बारावे**, ख्रिस्ती जनतेचे जागतिक धर्मगुरु

## पशुतेवर शेवटचा हात

गांधींचा खून म्हणजे आमच्या पिढींत उत्पात निर्माण करणाऱ्या पाशवी वातावरणावर फिरवला गेलेला शेवटचा हात होय.

युरोपनें राष्ट्रीयत्व निर्माण केलें. हें तत्व आतां आशियांत आणि आफ्रिकेंत शिरलें आहे आणि अत्याचार व रक्त यानीं तें माखलें जात आहे.

**कौंत कार्लो स्फोर्झा**, इटालीचे परराष्ट्र मंत्री

## शांततेची प्रत्यक्ष मूर्ति

महात्मा गांधी हे शांततेचे राजे–शांततेची अपवादात्मक अशी प्रत्यक्ष मूर्ति होते. त्यांच्या निधनानें मानवतेचें नुकसान झाले आहे.

**स्वित्सर्लंडच्या फेडरल कौन्सिलचे अध्यक्ष**

## हिंदी स्वातंत्र्याचे प्रतिनिधि

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचे प्रतिनिधि महात्मा गांधी याच्या निधनाने देशाला जें दुःख झालें आहे त्यांत मी सहभागी आहें.

**डॉ. यदुआर्द बेनेस**, झेकोस्लोवाकियाचे अध्यक्ष

## बांधवांसाठीं सर्वस्वत्याग

आपल्या बांधवांच्या कल्याणासाठीं सर्वस्वत्याग करणाऱ्यांत त्यांचा हात कुणीही धरूं शकणार नाहीं.

**डॉ. लुई बील**, हॉलंडचे मुख्य प्रधान

## स्वातंत्र्य मिळविणारा नेता

हिंदुस्थानच्या अलीकडील स्वातंत्र्यलढ्यांत व आमच्या स्वातंत्र्यलढ्यांत साम्य आहे. हिन्दी लोक आपले भाऊ आहेत असेंच आम्हांला वाटे. दोन्ही देश एकमेकांचें हित चिंतीत आले आहेत. हिन्दी लोक आज शोक करीत

आहेत. आम्हीही त्यांच्याबरोबर दु ख करीत आहो. स्वातंत्र्याप्रत आणून सोडणारा त्यांचा नेता आज निघून गेला आहे आमची अशी प्रार्थना आहे कीं ज्या त्यागाने त्यांनीं हिन्दुस्थानला स्वातंत्र्य मिळवून दिले तो त्यांचा त्यागच हिन्दी जनतेला बंधुभाव व शांतता मिळवून देईल.

**इमॉन डी व्हॅलेरा**, आयरचे मुख्य प्रधान

## महायुद्धानें निर्माण केलेली पशुता

हिंदुस्थानांत शांततेसाठीं झगडणांना गांधींचा उतारवयांत खून करण्यांत यावा ही गेल्या महायुद्धाने लोकांच्या मनांत पशुता निर्माण केली आहे याचा पुरावा होय अशीच सुधारलेल्या जगाची समजूत होईल

**हान्स हेडटॉफ्ट**
डेन्मार्कचे मुख्य प्रधान

## जगाचे श्रेष्ठ नैतिक पुढारी

महात्मा गांधी हे जगाचे श्रेष्ठ नैतिक पुढारी होते त्यांच्या मृत्यूने हिंदुस्तानचे अति नुकसान झाले आहे.

**डॉ. सालाझार**
पोर्तुगालचे प्रधान मंत्री

## फिन्लंडला दुःख

महात्मा गांधीच्या भयंकर निधनाने फिनीश जनतेला अत्यंत दुःख झाले.

**फिन्लंडचे मुख्य प्रधान**

## नॉर्वेंत चिरंजीव

या भयंकर व निर्बुद्ध गुन्ह्यानें हिंदुस्थान आपल्या एका सुपुत्राला गमावून बसला आहे. महात्मा गांधींची स्मृति आणि मानवांतील शांति व बंधुभाव याच्यासाठीं त्यांनी जन्मभर केलेलें स्फूर्तिदायक कार्य हीं नार्वेत चिरंजीव राहातील.

**नॉर्वेचे परराष्ट्र मंत्री**

# अमेरिका

## आणखी एका नरश्रेष्ठाची आहुति

महात्मा गांधी हे आंतराष्ट्रीय पुढारी होते त्यांचे जीवनकार्य हेच श्रेष्ठतम स्मारक उपदेशक आणि पुढारी या दृष्टीने केवळ हिंदुस्थानवरच नव्हे तर अखिल जगावर त्यांचे वर्चस्व प्रस्थापित झालें होते शांततेच्या चहात्यांना त्यांच्या मरणानें अत्यंत दु ख झालें असेल.

बंधुभाव व शांतता यांच्या प्रस्थापनेचे कार्य करताना आणखी एका नरपुंगवाची आहुति पडली आहे ज्यासाठीं त्यांनीं प्राणाहुति दिली तें परस्परांत सहकार्य आणि विश्वास निर्माण करण्याचे महात्म्याचें ध्येय निश्चयानें साध्य करण्यासाठीं आशियातील लोकांना त्यांच्या मृत्यूचें भीषण वृत्त ऐकून स्फूर्ति प्राप्त होईल

**प्रेसिडेंट ट्रुमन**

## मानवजातीच्या सदसद्विवेक बुद्धीचे उद्गाते

महात्मा गांधी हे मानवजातीच्या सदसद्विवेक बुद्धीचे उद्गाते होते या देशांत त्यांच्याबद्दल जें दु ख वाटत आहे त्यावरून अमेरिका व हिंदुस्थान या दोन देशांत किती प्रेमसंबंध वसत आहे ते दिसून येते.

**जॉर्ज मार्शल**, अमेरिकेचे सेक्रेटरी ऑफ स्टेट

## आशियाचे पुढारी

महात्माजी हे केवळ हिंदुस्थानचेच पुढारी नव्हते तर ते आशियाचे पुढारी होते ते मरण पावले तरी अमरच आहेत.

**मिसेस रूझवेल्ट**

## प्रेषित

या पूज्य पुरुषाच्या हत्येसारखी मनाला चीड आणणारी गोष्ट आधुनिक जगाच्या इतिहासात दुसरी घडली नसेल त्यांना हिंसेनें आलेलें मरण हा तर्कवादाला विसंगत असा कटुतर कालव्यत्यास होय

स्वतःच्या काळापेक्षां कितीतरी पुढचे जीवन जे प्रेषित जगले त्यांच्या-पैकीं एक गांधी होते

**जनरल डग्लस मॅकार्थर**

पूर्वेकडील दोस्त सैन्याचे कमांडर इन चीफ

## जिवंतपणीं साधलें नाहीं तें मृत्यूनें साधेल

गांधींच्या अंताने अखिल जगाचें नुकसान झाले आहे. आमच्यापुढील प्रश्न सोडविण्यासाठीं आध्यात्मिक शक्तीची जरूर आहे हें इतर कुणाहीपेक्षा त्यानीच अधिक जाणलें होतें.

हिंदी जनतेचें हित जें गांधी जिवतपणीं साधूं शकले नाहीत तें त्यांच्या मृत्यूनें साधेल अशी मला आशा आहे.

**एल्बर्ट थॉमस**

अमेरिकेच्या परराष्ट्रीय संबंध समितीचे सभासद

## भारताच्या इभ्रतीवर व स्वातंत्र्यवादावर आघात

गांधींच्या अत्याचारी हत्येनें पाश्चिमात्य राष्ट्रांत वाढत असलेल्या हिंदुस्थानच्या इभ्रतीवर आघात झाला आहे इतकेंच नव्हे तर लोकांच्या स्वातंत्र्यवादावर त्यानें घाला घातला आहे.

आज स्वातंत्र्यवादाचे शत्रू आनंद करीत असतील तर इतर लोक मानवी इतिहासातील या महान् पुरुषाच्यां निर्वाणाबद्दल अश्रू ढाळीत असतील.

ज्या तत्त्वांसाठीं गांधींना मरण आलें तीं तत्वे सिद्ध करण्याचा निश्चय करण्याची मोठी जबाबदारी त्यांच्या मृत्युमुळें भारतावर पडलीं आहे. पहिल्या प्रथम आम्हीं पंडित नेहरूंबद्दल सहानुभूति व्यक्त करतों. कारण हिन्दुस्थानच्या

काळ्या क्षितिजावर ते एकाकी उभे आहेत. हिंदुस्थान नेहरूंकरतां काय करणार आहे ? स्वतःच्या हितासाठीं हिन्दुस्थाननें नेहरूंना पाठिंबा दिला पाहिजे या क्षणीं त्यांची जागा घेणारा दुसरा कुणीही नाहीं.

हिन्दुस्थान देश परकीयांची साम्राज्यसत्ता झुगारून देऊन स्वातंत्र्य मिळविणाऱ्या लोकसमूहाचें प्रतिक बनला आहे. गेल्या महिन्यांत अमेरिकेन हिन्दची इभ्रत जितकी वाढली तितकी ती कधींही वाढली नव्हती अत्यंत आणीबाणीच्या वेळीं गांधीजींचा मृत्यु ओढवला आहे. हुतात्म्याविषयीं वाटणारा आदर वृद्धिंगत झाला आहे. हिन्दी जनतेवर आता सर्व गोष्टी अवलंबून आहेत. जग निरीक्षण करीत आहे आणि वाट पाहात आहे.

**मिसेस पर्ल बक**

## दुसरे लिंकन

अब्राहम लिंकनप्रमाणें गांधीजींनीं राष्ट्र जगावें म्हणून आत्मबलिदान केलें आहे. गांधींचा जन्म हें हिंदुस्थानचें भूषण होय साऱ्या जगाला त्यांची गरज असतांना महात्माजी गेले याचें मला दुःख होतें

परंतु महात्माजी आपल्या शिकवणीच्या रुपानें जिवंत आहेत. त्याच्या मृत्यूने त्याच्या शिकवणीकडे साऱ्या जगाचे लक्ष खेचलें गेलें आहे. त्याचीं तत्त्वें आचरणांत आणून गांधीजींचा मानवतेवरील विश्वास योग्य होता हे आपण सिद्ध करूं.

**मद्रासमधील अमेरिकन कॉन्सल जनरल**

## गौतमबुद्ध आणि येशू ख्रिस्त

महात्मा गांधी हे गौतम बुद्धानंतर झालेले मोठ्यांत मोठे हिंदी पुरुष आणि येशू ख्रिस्तानंतर झालेले मोठ्यांत मोठे जागतिक पुरुष होते.

**डॉ. जॉन हेन्स होम्स**

## आणखी एक काळा ढग

गांधींचा मृत्यु म्हणजे आंतरराष्ट्रीय वातावरणात उत्पन्न झालेला आणखी एक काळा ढग आहे

**राऊल फर्नांडीस**, ब्राझीलचे परराष्ट्रमंत्री

## एक प्रतिक

गांधी हे केवळ पुढारी नव्हते. त्याहून ते अधिक होते ते एक प्रतिक होते या अत्याचाराचे परिणाम काय होतील याची कल्पनाच करता येत नाही.

**ओस्वाल्ड आरान्हा**, राष्ट्रसंघाचे माजी अध्यक्ष

## जगाच्या मूलतत्त्वांची हानि

गांधींच्या आकस्मिक आणि शोककारक मृत्यूनें माझ्या मनांत उत्पन्न झालेली वेदनेची भावना मी लपवूं शकत नाहीं. जर सारेच राजकीय अत्याचार निंद्य असले तर प्रस्तुत अत्याचार अधिक निंद्य व हृदयविदारक आहे. कारण प्रेमाचा शस्त्राप्रमाणें उपयोग करणाऱ्या जनतेचे ते पुढारी होते. त्यांच्या मरणानें जगाच्या मूलतत्त्वांची हानि झाली आहे. कोटयवधि मानवी मनांत त्यांच्या शिकवणीचीं बीजें रुजलीं नाहींत तर त्यांचा मृत्यु म्हणजे मानवजातीची कधींही भरून न येणारी हानि होय असेंच मी म्हणेन.

**गाब्रिएल गोंझालेज व्हिडेला**, चिलीचे अध्यक्ष

# पाकिस्तान

## हिंदु जमातीनें निर्माण केलेल्या सर्वश्रेष्ठ पुरुषांपैकीं एक

आमच्यांत कितीही राजकीय मतभेद असले तरी हिंदु जमातीने निर्माण केलेल्या सर्वश्रेष्ठ पुरुषांपैकीं ते एक होते. हिंदु समाजाच्या सार्वत्रिक विश्वासास आणि आदारास पात्र झालेले ते पुढारी होते मृत्यूच्या पार्श्वभूमीवर मतभेदाला जागा नसते.

हिंदुस्थान आणि पाकिस्तानच्या स्वातंत्र्याचा जन्म झाल्यानंतर अल्पावधींतच आणीबाणीची परिस्थिति ओढवावी यानें मला अत्यंत दुःख होतें. विशाल हिन्दु जमातीच्या आणि त्याच्या कुटुंबियाच्या दुःखात मी सहभागी आहे.

हिन्दुस्थानच्या वसाहतींची ही कधींही न भरून येणारी हानि झाली आहे. एवढ्या मोठ्या पुरुषाच्या मृत्यूमुळें झालेली ही हानि या क्षणीं भरून येणें अत्यंत कठीण आहे.

**जनाब जिना**, पाकिस्तानचे गव्हर्नर जनरल

## कॉंग्रेसचे पिताजी

गांधीजींवर झालेला हल्ला हें एक भ्याड कृत्य आहे आणि प्रत्येक मनुष्य अत्यंत कडक शब्दांत त्याचा तीव्र निषेध करील याची मला खात्री आहे.

आमच्या कालांतले ते एक थोर पुरुष होते. माणसात माणुसकी आणण्यासाठीं आणि जातीय ऐक्य करण्यासाठीं ते अविश्रांतपणें झटत होते.

गेलीं कित्येक वर्षे ते कॉंग्रेस पक्षाचे आत्मा होऊन बसले होते कॉंग्रेसचे ते पिताजी होते असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति ठरणार नाहीं. अहिंसेचे तत्वज्ञान शिकविण्यात सारा जन्म घालविलेला पुरुष हिंसेचा बळी व्हावा हा दैवाचा दुर्विलास होय. जातीय ऐक्यासाठीं त्यांनी नुकतेच केलेले प्रयत्न शांतताप्रेमी माणसांच्या स्मरणांत नेहमींच राहातील हिंदी राजकारणाच्या रंगभूमिवरून त्याचें या क्षणीं झालेलें उच्चाटन ही कधींही भरून न येणारी हानि आहे.

**लियाकत अली खान**, पाकिस्तानचे प्रधान मंत्री

## पुरःफलाचें प्रसादचिन्ह !

ज्याचें आयुष्य हिंदुस्थानच्या आणि जगाच्या सेवेंत गेलें आणि आज हिंदुस्थानला झालेल्या जखमा भरून काढण्यास ज्याच्या सेवा-शुश्रूषेची आत्यंतिक गरज होती त्यांचा एका मारेकऱ्याच्या भेकड हातानें शेवट व्हावा ही अत्यंत मोठी आपत्ति होय.

हा भयकर अत्याचार म्हणजे विविध क्षेत्रांत ओढवणाऱ्या आपत्तीच्या पुरःफलाचे प्रसादचिन्ह ठरूं शकेल. म्हणून या शोकप्रसंगी आपण प्रार्थना करूं या कीं हिंदुस्थानातील निरनिराळया जातींच्या नेत्यांनी एकत्र येऊन या अशुभ आपत्तींच्या प्रतिकारासाठीं झटावे. ज्यांच्यासाठी आपण दुःख करीत आहों तो महान नेताही याच ध्येयसिद्धिसाठीं जन्मभर झगडला होता

**सर महमद झाफरुल्ला खान**

पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री व राष्ट्रसंघाच्या पाकिस्थानी शिष्टमंडळाचे प्रमुख

## इतिहासाचा प्रवाह बदलविणारे पुरुष

आधुनिक इतिहासाचा प्रवाह बदलविणारे जे पुरुष होऊन गेले त्यांपैकीं गांधीजी एक होते. कोणत्याही प्रश्नावर जनतेची प्रभावी संघटना करण्याची जबदरस्त शक्ति त्याना लाभली होती. हिन्दी उपखंडांतील जनतेची राजकीय जागृति त्यांनीं एका विशिष्ट आणि अपूर्व प्रकारे केली.

हिन्दुस्थान आणि पाकिस्तानच्या स्वातंत्र्यानंतर जी दुर्दैवी घटना घडली तिच्यामुळे महान् प्रश्न निर्माण झाले. या प्रश्नाच्या सोडवणुकीसाठी आणि या दोन वसाहतींतील संबंध सुधारण्यासाठीं त्यांच्या हिन्दी जनतेवरील वजनाचा खासच उपयोग झाला असता

जातीयवादाच्या कॅन्सरमध्ये जो धोका लपून बसला आहे तो हिंदू मारेकऱ्याने केलेल्या गांधीजींच्या हत्येमुळे हिन्दु-मुसलमानांच्या दृष्टोत्पत्तीस येईल आणि परस्परातील स्नेहसंबंध वाढविण्यास ते बद्धपरिकर होतील

**आय. आय चुंद्रीगर**, पाकिस्तानचे व्यापार मंत्री

## अस्पृश्यतेचा कलंक धुवून काढणारे सर्वश्रेष्ठ पुरुष

शांतता व अहिंसा यांच्या देवदूताला ठार करणारा इसम मानवरूपानें वावरणारा अतिनीच राक्षस असला पाहिजे

पूर्ण निरिच्छपणें मानवतेच्या सेवेला वाहून घेतलेला महात्म्याशिवाय दुसरा मनुष्य सापडणार नाहीं. अस्पृश्यता हा हिंदी राष्ट्रियत्वावरील कलंक धुवून काढण्याकरता त्यांनी चालविलेले प्रयत्न कालांतरानें यशस्वी झाल्याशिवाय राहाणार नाहींत. खरोखर, जगांतील ते सर्वश्रेष्ठ पुरुष होते.

**जोगेंद्रनाथ मंडल**, पाकिस्तानचे कायदा व मजूर मंत्री

## अल्पसंख्याकांच्या हक्कांची प्रेरणा

हिन्दुस्थान आणि पाकिस्तान अल्पसंख्याकांना स्वतःच्या मूळ घरांत त्या त्या राष्ट्राचे नागरिक म्हणून समानतेनें व सन्मानानें राहाण्याचा हक्क मिळवून देण्याच्या बाबतींत गांधीजींचा दुःखद मृत्यु जनतेला प्रेरणा देईल अशी मी आशा करतों.

**एम. ए. खुरो**, सिन्धचे मुख्य प्रधान

## त्यांच्या तत्त्वांची स्मृति कायम ठेवूं

गांधीजी हे देशाच्या स्वातंत्र्याचे शिल्पकार होते. त्यांच्या जातीय ऐक्य, अहिंसा व न्याय या तत्त्वावर विश्वास ठेवून जनतेनें जगलें पाहिजे व त्यांच्या तत्त्वांची स्मृति कायम राखली पाहिजे.

**सरदार अबदुल रब निश्तार**

## इतिहासांत चिरंजीव

थंड डोक्याने महात्मा गांधींचा खून करण्यांत आला ही अनिष्ट बातमी ऐकून आमच्या लोकांना एवढा मोठा धक्का बसला कीं ही गोष्ट खरी नसली पाहिजे अशी प्रत्येकजण मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न करूं लागला आहे.

महात्मा गांधी ही जगांतली सर्वश्रेष्ठ विभूति होती. हिंदु आणि मुसलमानात म्हणजेच या दोन राष्ट्रांत सलोखा नांदावा म्हणून ते सर्व सामर्थ्य इरेला घालून झगडले.

त्यांच्या मृत्यूनें मानवजात एका सामर्थ्यशाली पुरुषाला अंतरली आहे. इतिहासांत अनेक मोठया लोकांचीं नांवें नष्ट होऊन गेल्यानंतरही दीर्घकाळपर्यंत ते जगणार आहेत. जिवंत असतांना जें ते मिळवूं शकले नाहींत तें आपल्या मृत्यूनें ते संपादन करतील अशी आशा करूं या.

**खान अब्दुल कयूम खान**
सीमाप्रांताचे मुख्य प्रधान

## या उपखंडाच्या भविष्यांत काय आहे ?

महात्मा गांधींच्या मृत्यूनें हिंदुस्थानच्या इतिहासांतील त्यांनींच निर्माण केलेल्या एका युगाची समाप्ति झाली आहे. या भूमीच्या भवितव्यांत काय वाढून ठेवलें आहे याची आम्हांला कल्पना करवत नाहीं. त्यांच्यावर कुरघोडी करणारी पाशवी शक्ति आपल्या क्रूर नखांनीं हें उपखंड व्यापणार आहे कीं महात्मा गांधींचा आत्मा अधिक बलशाली होऊन पुन्हा परत येणार आहे आणि या क्रूर रानटी शक्तींवर विजय मिळविणार आहे हें आतां पहावयाचे आहे. ज्या उच्च तत्त्वांसाठीं त्यानीं आपलें जीवन वाहिलें आणि मरण पत्करलें त्या तत्वांना आम्ही किती वाहून घेतों यावर तें अंशतः अवलंबून आहे.

**मियां इफ्तिकार उद्दिन**, पश्चिम पंजाब मुस्लिम लीगचे अध्यक्ष

## अल्पसंख्याकांचा वाली

अल्पसंख्याकांचा वाली व दोन्ही वसाहतींचा मित्र मरण पावल्याबद्दल पश्चिम पंजाबच्या कॉम्युनिस्ट पक्षाला दुःख होत आहे.

**प. पंजाब कॉम्युनिस्ट पक्षाचा ठराव**

## अराजक शक्तींचें प्राबल्य ?

या दुर्दैवी राष्ट्रांत ज्या अराजक शक्तींनी अनर्थ घडवून आणला त्याना मिळालेलें मोकळें रान असा या घटनेचा-महात्मा गांधींच्या मृत्यूचा अर्थ होणार नाहीं अशी मी आशा करतों. मी अशीही मनापासून आशा आणि प्रार्थना करतों कीं शांतीचा हा प्रेषित देहानें आमच्यांत नसला तरी त्याचा आत्मा राष्ट्राला मार्गदर्शन करील. त्यांनीं हिंदुस्थानाला मिळवून दिलेलें स्वातंत्र्य लष्करी फॅसिस्ट शक्तींच्या प्राबल्यानें नष्ट होणार नाहीं याची गांधीजींवर प्रेम करणाऱ्या हिंदूंनीं काळजी घेतली पाहिजे. **फिरोज खान नून**

## हिंदुस्थानें निर्माण केलेले फार मोठे पुढारी

महात्मा गांधी हे हिंदुस्थाननें निर्माण केलेले अनेक शतकांतले फार थोर पुढारी होते. शांततेच्या पुनर्प्रस्थापनेच्या त्यांच्या प्रयत्नाकडे साऱ्या जगानें लक्ष वेधलें होतें. मला खात्री आहे कीं सर्व शांतिप्रिय लोकांच्या हृदयात त्यांचें स्थान अढळ राहील.

**खान इफ्तिकार हुसेन**, पश्चिम पंजावचे मुख्य मंत्री

## पाकिस्तानचे मित्र

दोन्ही वसाहतींचा भविष्यकाळ धुक्यात गुरफटून गेला आहे. आधींच रक्ताळलेल्या लाखों लोकांच्या नशिबांत काय आहे कुणाला ठाऊक ? लाखों हिन्दी मुसलमानांचा त्राता निघून गेला महात्मा गांधी पाकिस्तानचे फार मोठे मित्र होते.

**महमद युसफ**
पाकिस्तानी सोशालिस्ट पार्टीचे सरचिटणीस

## नीच कृष्णकृत्य

हिन्दुस्थान आपल्या परमश्रेष्ठ पुत्राला मुकला आहे महानीच कृष्णकृत्य म्हणून इतिहासांत ही घटना नोंदली जाईल.

**ख्वाजा नजिमुद्दीन**, पूर्व बंगालचे मुख्य प्रधान

## उज्ज्वल प्रकाश

देशावर आणीबाणीची परिस्थिति आली असताना गांधीजी जावे ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. अंधारांतून मार्ग काढण्यास उपयोगी पडणारा तो एकच एक प्रकाशकिरण होता. त्याचीं सत्य, अहिंसा व प्रेम हीं तत्वें आपल्याला मार्गदर्शन करतील अशी मी आशा करतों.

**खान अब्दुल गफारखान**

## मानवजातीचे महान् सेवक

गांधीजींच्या मृत्यूनें मानवजातीच्या महान सेवकाला आम्ही अंतरलों आहों. मानवतेच्या सेवेसाठींच त्यांनीं आत्मबलिदान केलें. हिंदु-मुसलमानात स्नेह, प्रेम व ऐक्य निर्माण करण्याच्या त्यांच्या प्रयत्नांकडे सर्व जग आणि विशेषत· हिन्दी उपखंडांतील लोक सदैव आदरानेंच पाहातील.

**मंकी शरीफचे पीरसाहेब**

## हिंदी मुस्लीमांचीं दुःखें वाढलीं

स्वातंत्र्याचे कैवारी आणि शांततेचे प्रेषित एवढेंच महात्मा गांधींचें इतिहासात स्थान नसून दुर्बलांचे व दुःखितांचे महान मित्र म्हणून ते चिरंजीव

होतील. ते गेल्यामुळें हिन्दुस्थानांतील मुस्लीम अल्पसंख्याकांचीं दुःखें अनेक पटींनी असह्य होणार आहेत. हिन्दी मुस्लीमांच्या संरक्षणासाठीं त्यांनीं जी भावना व्यक्त केली त्यामुळें हिन्दी मुसलमानांचेंच नव्हे तर हिन्दी संघाबाहेरील मुसलमानांचेंही आत्यंतिक प्रेम व आदर त्यांनीं संपादन केला.

**गजनफार अलीखान**, पाकिस्तानचे निर्वासित मंत्री

## असें मरण व्यर्थ जात नाहीं

महात्मा गांधीच्या मृत्यूनें हिंदी व जागतिक सामाजिक जीवनावर काय परिणाम होतील हे आजच सांगता येणार नाही मानवतेसाठींच त्यानें जीवन समर्पण केलें इतकें मात्र निश्चयानें सांगता येईल बंधुभावाचा संदेश देण्याचें त्यांनीं धारिष्ट केलें म्हणूनच त्यांना हुतात्म्याचें मरण आलें असें मरण व्यर्थ जात नाहीं ज्यासाठीं त्यानीं मरण पत्करलें तीं तत्त्वेंच नव हिंदुस्तानपुढचा मार्ग उजळ करतील.

**पूर्व पाकिस्तानचे गव्हर्नर**

# मध्यपूर्व

## त्यागाचें व शौर्याचें अमर प्रतीक

अहिंसक लढ्यानें आपलें भूतदयावादाचें व स्वातंत्र्याचें ध्येय गाठण्यात विजयी होणारे महात्मा गांधी हे त्यागाचें व शौर्याचें उदात्त उदाहरण म्हणून अनंत काळपर्यंत अमर राहातील. आज मात्र पूर्व एका राष्ट्रभक्ताला आणि जग व मानवता एका महापुरुषाला मुकली आहे

**इजिप्तचे राजे फरूक**

## शांतिस्वरूप हिंदी पुढारी

हिंदु-मुस्लीम ऐक्याचे प्रयत्न करीत असताना ऐन मोक्याच्या वेळीं शांतिस्वरूप हिंदी पुढाऱ्याला मृत्यू आला याबद्दल जगांतील इतर राष्ट्रांप्रमाणें इजिप्तलाही दुःख होत आहे. जगात जे अत्यंत थोर पुरुष होऊन गेले त्यांपैकीं एक ते होते.

**नोक्राशी पाशा**, इजिप्तचे प्रधान मंत्री

## मानवतेविरुद्ध हीन गुन्हा

मानवतेविरुद्ध जितका म्हणून अति हीन गुन्हा करता येईल तितका हा गुन्हा आहे. जग एका महान् पुरुषाला मुकलें आहे.

**आझम पाशा**, अरब लीगचे सेक्रेटरी

## उच्च ध्येयांवर भयंकर आघात

एका विशिष्ट लोकसमूहासाठींच नव्हे तर सर्वांसाठीं त्यांनीं शांतीची आराधना केली. गांधीजींचा मृत्यु हा उच्च ध्येयांवर भयंकर आघात आहे. त्याचे परिणाम हिंदुस्थान, पाकिस्तान व सर्व जग यांच्यावर झाल्याशिवाय राहाणार नाहींत.

**नहास पाशा**, वफद पक्षाचे पुढारी

## महान् भूतदयावादी

जगांतील अत्यंत श्रेष्ठ पुरुष म्हणून मीं महात्मा गांधींना मानीत आलों आहे. इतिहास घडविणाऱ्या आपल्या महान् पुढाऱ्याला हिंदुस्थान मुकला आहे आणि शांततेसाठीं दुष्ट प्रवृत्तींशीं अविरतपणें झगडणाऱ्या एका महान् भूतदयावाद्याला जग मुकलें आहे.

**कामिल चांद्रची**

इराकच्या नॅशनल डेमोक्रॅटिक पार्टीचे पुढारी

## मानवतेचें दुर्दैव

महात्मा गांधींचें निधन हें साऱ्या मानवतेचें दुर्दैव आहे.

**तुर्कस्तानच्या कौन्सिलचे अध्यक्ष**

## नैतिक नेते

महात्मा गांधींच्या मृत्युमुळें हिंदुस्थानलाच दुःख होईल असें नसून सारें जग दुःखित झालें आहे कारण ते एक महान् पुरुष व मानवतेचे नैतिक नेते होते.

**हेले सेलासी**, अबिसीनियाचे बादशहा

## जगाची त्रेधा

या थोर देशभक्ताच्या मरणानें जगाची घाबरगुंडी उडाली आहे.

**सीरियाच्या कौन्सिलचे अध्यक्ष**

## सुधारलेल्या जगाची हानि

जगांत शांतताप्रेमी लोकाचे गांधी महत्तम पुढारी होते. गांधींचा मृत्यु ही हिंदुस्थानचीच नव्हे तर मानवतेची व सुधारलेल्या जगाची हानि आहे.

**इराकचे रीजंट**

महात्मा गांधींच्या दुःखद व अमानुष वधाची बातमी ऐकून आम्हा साऱ्यांना धक्का बसला ते शांतताप्रेमी महत्तम देशभक्त व हिंदी जनतेचे अत्यंत आवडते पुढारी होते

**अफगाणिस्तानचे मुख्य प्रधान**

# अतिपूर्व

## हिंदी स्वातंत्र्याचे शिल्पकार

एका महान् आध्यात्मिक नेत्यांना आमच्यांतून नेण्यात आलें आहे जगाला त्याची फार गरज होती.

गांधी हे हिन्दी स्वातंत्र्याचे शिल्पकार होते. त्यांचा स्वार्थत्याग आणि पराक्रमी नेतृत्वाशिवाय हिन्दला इतक्यांतच आपलें ध्येय साध्य करता आलें नसतें.

हिंदी जनतेच्या उच्च ध्येयांचें प्रतीक त्यांच्या व्यक्तींत सामावलें होतें. हिंदुस्थानच्या एकतेसाठीं आपला शेवटचा लढा देता देता त्यांचा बळी घेण्यात आला. अखंड भारताच्या ध्येयासाठीं त्यानीं जो देह ठेवला त्यामुळें मोठेपणाच्या अति उच्च बैठकीवर त्यांची मूर्ति विराजमान झाली आहे

महात्मा गांधी हे महान् एशियाटिक होते. त्यांचीं ध्येयें भावि पिढीला प्रेरक होतील.

**चीन सरकारचें पत्रक**

## साधुतुल्य धर्मवीर

अहिंसेच्या द्वारा शांततेच्या पुरस्कारासाठीं झगडणारा साधुतुल्य धर्मवीर हिंसेला बळी पडावा ही हृदयाला घरे पाडणारी दुःखद घटना आहे.

**चीनचे अध्यक्ष चँग कै शेक व मादाम चँग कै शेक**

## आशियाचा अभिमान आणि स्फूर्ति

हिंदुस्थानच नव्हे तर सारें जग आपल्या महान् नेत्याला मुकलें आहे त्यांचें जीवन म्हणजे आशियातील लोकांना अनंत काळपर्यंत अभिमानाचें उगमस्थान वाटेल आणि त्यांच्या मृत्यूनें त्याना स्फूर्ति मिळेल.

**चँग चून**, चीनचे मुख्य प्रधान

## एकमेव संत

हिंदुस्थाननें निर्माण केलेले गांधी हे एकमेव संत व प्रेषित होत. फक्त हिंदुस्थानसारख्या राष्ट्रांत किंवा आशियासारख्या खंडातच आध्यात्मिकतेच्या योगाने मनुष्य जबरदस्त राजकीय सत्ता संपादन करूं शकतो. गांधीसारखी विभूति पाश्चात्य जगात होणेंच शक्य नाहीं. पूर्वेच्या राजकारणात ढवळाढवळ करण्याची जरूर नाहीं हें पाश्चात्यांनीं समजून राहिलें पाहिजे

**लिन यू टांग**, चीनी तत्वज्ञ व ग्रंथकार

## दुःखाचा प्रसंग

अत्यंत दुःखाचा असा हा प्रसंग आहे.

**जपानचे बादशहा हिरोहिटो**

## गांधीसाठीं नव्हे, जगासाठीं रडतों

आम्ही शोक करतों तो गांधीसाठीं नव्हे तर सर्व जगासाठी. प्रश्न सोडवण्यासाठीं शक्तीचा उपयोग करण्याचें टाळलें पाहिजे.

**तेत्सु कातायामा**, जपानचे मुख्य मंत्री

## ब्रह्मदेशच्या स्वातंत्र्य प्रयत्नांत मदत

सर्व आयुष्यभर ब्रह्मदेशाच्या स्वातंत्र्य प्रयत्नात ज्यानीं मन घातले त्या महान् हिंदी पुढाऱ्याच्या मृत्यूनें सारा ब्रह्मदेश भरलेल्या अंतःकरणाने व कृतज्ञतेच्या भावनेनें दु:खांत चूर होऊन गेला आहे. या संदर्भा प्रसगीं एका महान राष्ट्राला शोभेल अशा शांततेनें व सामर्थ्यानें हिंदी लोक उभे ठाकतील अशी मला आशा आहे.

**साओ शू थाईकी**, ब्रह्मदेशचे अध्यक्ष

## ब्रह्मदेशाची हानि

महात्मा गांधींचें निधन ही ब्रह्मदेशाची देखील हानि असे इथें सर्वांना वाटत असून आजचा दिवस हा ब्रह्मदेशाचा शोकदिन आहे

**थाकीन नू**, ब्रह्मदेशचे मुख्य प्रधान

## संकटकालीन दीपस्तंभ

पूर्वेजवळ जें जें अत्यंत चांगलें आहे त्यांचें प्रतीक म्हणजे महात्मा गांधी. संकटकाळीं अचुक मार्गदर्शन करणारा आकाशदीप मालवल्यासारखा दिसत असला तरी तें सत्य नाहीं. चिरंजीव पुरुषांपैकीं महात्मा गांधी हे एक आहेत आणि मानवजातीचे ते गुरु आहेत. आत्मबलानें असत्प्रवृत्तींवर विजय मिळवावा ही त्यांची शिकवण आचरणांत आणण्याचा जग यापुढे उत्साहानें प्रयत्न करील.

**सेना नायके**, सिलोनचे मुख्य मंत्री

## शांततेचे व स्वातंत्र्याचे देवदूत

गांधींच्या मृत्यूनें झालेली हानि ही आमचीच हानि असें आम्ही समजतों. ते स्वातंत्र्याचे व शांततेचे देवदूत होते.

**सोकार्नो व डॉ. हाटा**

इंडोनेशियन रिपब्लीकचे अध्यक्ष व उपाध्यक्ष

## मानवी स्वातंत्र्याचे कैवारी

आतांपर्यंत होऊन गेलेल्या महत्तम पुरुषांतील एक आज आपल्यातून गेला आहे. ते आमच्या काळांतले स्वातंत्र्याचे कैवारी होते. जगातील स्वातंत्र्य-प्रेमी जनता त्यांच्या मृत्यूनें कमालीची दुःखी होईल.

**मानुएल रॉक्सास**, फिलिपाइन्सचे अध्यक्ष

# कांहीं परदेशी वृत्तपत्रें

## विजयाचा विषाद

गांधींनीं जो जातीयवाद गाडण्याचे प्रयत्न केले तो किती उग्र आहे हे गांधींच्या खुनाच्या विद्युत्पातामुळें दिसून आलें हिंदु-मुस्लीम ऐक्यासाठीं त्यांनीं हाक मारली. बंगालमधील दौरा आणि परवाचे उपोषण यांनीं ती अधिक तीव्र केली काहींसें यश त्याना मिळूं लागलें होते. परंतु त्याची हाक कानावर घ्यायचीच नाहीं असें कांहीं लोकांनीं ठरविलें होतें.

ज्या तत्त्वासाठीं गांधींनी आपल्या जीवनाचें बलिदान केले ती जिवंत आहेत. त्याच्याविषयीं आदर बाळगणारे आणि त्यांच्या मृत्यूने विव्हल होणारे जे असंख्य लोक आहेत त्याच्यावर राष्ट्रात शांतता नांदविण्याच्या कार्याची जबाबदारी आहे परंतु समझोता व झगडा त्याच्यामधली भेदरेषा मात्र अत्यंत निरुंद आहे. गांधींची स्मृति आणि त्याचें उदाहरण याच्या कसोटीची ही वेळ आहे. हिंदुस्थान व पाकिस्तान या दोघांच्याही भवितव्याचा हा प्रसंग आहे.

अत्यंत दारुण घटना म्हणून इतिहास गांधीचा मृत्यू नमूद करून ठेवील. त्याचबरोबर दलित वर्गाच्या सामाजिक व राजकीय उद्धाराच्या त्यांच्या धाडसी प्रयत्नाचाही निर्देश करील. अराजक व दहशतवाद याच्याकडे जोरानें धांव घेणाऱ्या हिंदी तरुणाना त्यांनीं मागें खेचलें असाही त्याचा गौरवपूर्वक उल्लेख करील. सामाजिक सुधारणा घटनात्मक मार्गांनीं घडवून आणण्याच्या त्यांच्या शक्तीचें इतिहास कौतुक करील.

अल्पसंख्याकांना संतुष्ट करून ब्रिटिश सरकारपुढें जर त्यानीं संयुक्त मागणी ठेवली असती आणि त्यासाठीं लढयाची सिद्धता केली असती तर हिंदुस्थानचें भवितव्य काय होणार होतें हा प्रश्न यावेळीं विचारावासा वाटतो. मागणी मान्य केल्याशिवाय ब्रिटिश सरकारला दुसरा मार्ग उरला नसता. कांहीं कांहीं वेळां गांधींची दृष्टि साध्यावर खिळली आहे, साधनांत त्यांचें मन नसावें, असा भास होत होता. या दृष्टीनें हिंदुस्थानच्या प्रगतींत त्यांना प्रत्यक्ष भर घालतां आली नाहीं असें म्हणावें लागतें.

यामुळे ब्रिटीश जेव्हां स्वखुषीनें हिंदुस्थान सोडून गेले तेव्हा महात्म्याच्या विजयाच्या आनंदानें विषादाचें स्वरूप धारण केलें. कारण हिंदु-शीख-मुस्लीमांच्या कत्तली आणि हिन्दुस्थान–पाकिस्तानमधील निर्वासितांच्या लोंढयाची आ–ये, अशा त्यांच्या अपेक्षेच्या बरोबर विरुद्ध घटना घडूं लागल्या.

दि टाइम्स, लंडन

## गांधी राष्ट्रवादी नव्हते

हिंदी स्वातंत्र्याचें पुनरुज्जीवन त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें खरे, परंतु त्यांचें कार्य सफल झालें असें मात्र आम्हांस वाटत नाहीं. एका माणसाला झेपणार नाहीं इतकें काम आपणाला करावयाचे आहे हें त्यांनीं ओळखलें, पण ते पुढें चालवण्यासाठीं अनुयायांची सोय ते करूं शकले नाहींत. त्याचें सामर्थ्य आणि दुर्बलता या वस्तुस्थितींत होती.

त्यांच्यासारखे पूर्वी कुणी झाले नाहींत. आणि पुढे होतील असें वाटत नाहीं. आपल्या काळाचा गांधी हे विशिष्ट परिपाक होते. आपापल्या काळांत इतक्या जगप्रसिद्ध होणाऱ्या ऐतिहासिक व्यक्ति क्वचितच भविष्यकाळ त्याच्या यशाचा मोठेपणा कमी करील, परंतु त्याचें चारित्र्य मात्र विसरलें जाणार नाहीं. कारण अर्धशिक्षित, अर्धसंस्कृत अशा एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरकालीन व विसाव्या शतकाच्या पूर्वकालीन जगांत नव्या शक्तींचा संचार होत आहे. पूर्व आणि पश्चिमेच्या लढ्यांतली एक नवी बाजू उकलत आहे या गोष्टी गांधींच्या चारित्र्यावरून प्रतीत होतात.

गांधी ब्रिटिशविरोधी तर नव्हतेच पण राष्ट्रवादीही नव्हते. हिंदुस्थानांतील नऊ दशांश सुशिक्षित समाजाला ब्रिटिश सत्तेबद्दल जी चीड वाटत होती तितकी त्यांना वाटत नव्हती. परंतु आपलीं अहिंसेचीं तत्त्वे व गरीब शेतकऱ्यांचा अधिकार सरकार मानीत नाहीं हें दिसून आलें तेव्हां त्यांना ब्रिटिश सरकार सैतानी वाटूं लागलें. त्यांची सत्ता आपल्या अहिंसात्मक प्रतिकारानें नामशेष केली पाहिजे आणि करतां येईल असें त्यांचें मत बनलें आणि म्हणूनच राष्ट्रीयत्वाबद्दल जरी त्यांना फारशी आस्था वाटली नाहीं तरी हिंदी राष्ट्रीय चळवळीच्या अग्रभागीं राहून ब्रिटिश सरकारला विरोध केल्याशिवाय त्यांना गत्यंतर राहिलें नाहीं.

मँचेस्टर गार्डियन

## रुक्ष गूढवादी व धूर्त मुत्सद्दी

१८८८ च्या कडाक्याच्या हिंवाळयांत लंडनमध्यें एक हिन्दी विद्यार्थि आला. त्याच्या सावळ्या कातडीकडे आणि भेदरट धांदरट चेहऱ्याकडे ज्या लंडनवासीयाचें लक्ष जाई त्याला सहजच वाटे की बॅरिस्टर होण्यासाठीं जे अनेक हिंदी विद्यार्थी इंग्लंडमध्ये येतात त्यापैकींच हा एक असावा तो भर हिवाळयात वापरीत असलेली ती स्ट्रॉ-हॅट व गबाळा सूट काहींसा विलक्षण वाटे. परंतु त्याच्याशीं कांही मिनिटें संभाषण केलें—आणि त्याची इंग्रजी भाषा फार सुंदर होती—म्हणजे त्याची बुद्धिमता व गोड व्यक्तित्त्व दिसून येई. त्यावेळीं त्याचें नांव सामान्यापैकींच होतें. पण तेंच पुढें हिंदुस्थानच्या खळबळीच्या इतिहासात उठून दिसावयाचें होतें. करोडों हिंदूंच्या आशा-आकांक्षांचे ते प्रतिक व्हावयाचें होतें या नांवाचा धनी संत म्हणून ओळखला जाणार होता. मोहनदास करमचंद गांधी हें तें नांव. लवकरच त्याना महात्मा हे उपपद मिळालें. याच माणसाबद्दल–रुक्ष गूढवाद व धूर्त मुत्सद्दीपणा यांचें चमत्कारिक मिश्रण झालेल्या या माणसाबद्दल परकीयांना कोडें पडलें आहे.

**दि इव्हिनिंग न्यूस, लंडन**

## " हिंदुस्थानाकरितां प्रार्थना करा "

( अग्रलेखाचा मथळा )

स्वतःच्या आयुष्यातच ज्यांचा प्रभाव साऱ्या जगावर पडतो असे महा-पुरुष दरेक शतकांत फक्त तीन किंवा चारच निपजतात. त्यांच्यापैकीं एक महात्मा गांधी होत. हिंदुस्थानांतल्या आजच्या धामधुमीच्या इतिहासांतील आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांचा खून म्हणजे हिंदुस्थानवर झालेला जबरदस्त आघात होय. महायुद्ध संपतां संपतां घडलेल्या प्रेसिडेंट रूझवेल्टच्या मृत्यूशी या घटनेची तुलना करतां येईल गांधीचें साधुतुल्य अस्तित्व आणि गूढ शक्ति जे घडवून आणीत असे तें पाश्चिमात्य दृष्टीला ' चमत्कारा 'सारखें भासे कांहीं दिवसांपूर्वी त्यांनीं जो यशस्वी उपवास केला त्यामुळेंच दिल्लींतील धामधुमीचे रस्ते शांत होऊन तिथे पुन्हां शांतता नांदूं लागली.

धार्मिक चारित्र्याच्या अस्सल साधेपणाबरोबरच त्यांच्यांत मुत्सद्द्याचा धूर्त मेंदू वसत होता. जाहीरपणे हिंदी स्वातंत्र्याचा उद्‌घोष करीत असतांनाच हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्तेशीं तिच्या शेवटच्या दिवसांत त्यांनी सहकार्य केलें आणि तडजोडीचें धोरण स्वीकारलें.

हिंदुस्थानचें जें नुकसान झालें आहे त्याबद्दल सारें जग प्रार्थना करील करोडो हिंदी लोकांच्या भविष्यांत काय आहे हे कोण सांगूं शकेल ?

इव्हिनिंग स्टँडर्ड, लंडन

## ऐक्याची सुप्रभात

हिंदुस्थानात आता काय घडेल याचा विचार येताच मनाला भीति वाटते. गांधींच्या कार्यानंतर हिंदुस्थानात नवल वर्तेल अशी आशा करण्याचें कारण नाहीं. मात्र एक गोष्ट होणे शक्य आहे. लाखों लोक ज्यांच्याबद्दल पूज्यबुद्धि बाळगीत त्यांच्या मृत्यूनें आतांपर्यंत कर्तृत्वाला वाव न मिळालेले पुढारी पुढे येतील आणि शस्त्रापेक्षा जें प्रेम श्रेष्ठ त्या प्रेमाचा उदय या दुःखातिरेकांतून होऊन हिंदुस्थानांत शांततेची व ऐक्याची सुप्रभात होईल.

न्यूस क्रॉनिकल.

## उज्ज्वल जय कीं शेवटचा पराजय

आपल्याला जसें मरण यावें अशी त्यांनीं इच्छा केली असेल तसेंच मरण त्यांना आलें आहे. हा त्यांचा शेवटचा पराजय आहे कीं उज्ज्वल जय आहे हें आम्ही सांगूं शकत नाहीं.

डेली हेरॉल्ड, लंडन

## महात्म्याच्या सावलींत

गांधींच्या मृत्युमुळे जगांतल्या इतर राष्ट्रांप्रमाणेंच हिंदुस्थान आता युद्ध आणि शांतता यांच्या सीमारेषामधील अनिश्चित, अंधुक वातावरणात सापडला आहे. स्वर्गस्थ नेत्याची शिकवण अजून प्रभावी आहे आणि नवे नेते त्यांचें कार्य पुरें करण्यासाठीं पुढें येत आहेत कीं नाहींत हें पाहावयाचें आहे.

नवे गांधी पुन्हां निर्माण होतील अशी अपेक्षा करण्यांत अर्थ नाहीं—कारण शतकांच्या अंतरानें ते येत असतात. परंतु त्यांच्या महात्म्याच्या सावलींत राहिल्यामुळें माणसांच्या सामर्थ्यांत व शहाणपणांत वाढ झाली असणें शक्य आहे.

न्यूयॉर्क टाइम्स

## जगाचे संत

गांधींचा मोठेपणा आमच्या अनुभवाच्या चौकटींत बसविण्याचा प्रयत्न करण्याचा मोह आम्हां पाश्चात्य लोकांना लवकरच होईल, आणि त्याची दुर्बलता कशात होती याचा आम्ही अभ्यास करूं. परंतु एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे कीं गांधी हे नुसते महापुरुष नव्हते ते जागतिक संत होते. गेल्या कित्येक शतकात पश्चिमेला निर्माण करता आले नाहीत असे ते संत होते.

लाइफ, न्यूयॉर्क

## मरणोत्तर प्रभावी

गांधीच्या मृत्यूनेंच त्याची शिकवण अधिक प्रभावी होईल या नियमाला पूर्वदाखला आहे. ख्रिस्त, महमद जिवंत असताना त्यांच्या कार्याचा जेवढा प्रसार झाला त्याच्या कितीतरी पटींनें अधिक मरणोत्तर झाला.

दि क्रॉनिकल सां फ्रान्सिस्को

## भव्य अपेश

त्याच्या समकालीनाशीं तुलना केली असता गांधीची उंची खरोखरच राक्षसी भासते. समकालीनांना ते 'महात्मा' च होते.

जें विशाल कार्य त्यांनीं आपण होऊन अंगावर घेतलें होतें त्याच्या अनुरोधानें पाहिलें तरच ते अपुरे पडले असें म्हणतां येईल. या बाबतींत ते अपयशी ठरले असले तरी त्याचे हे अपेश 'भव्य अपेश' आहे. हिंदुस्थानच्या बालस्वातंत्र्यकाली जो रक्तपात आणि ज्या कत्तली त्यानीं पाहिल्या त्यावरून आपल्या कार्यात आपल्याला अपेश आले असें त्यानाही वाटे. परंतु त्यांच्या अपेशाचे मोजमाप भविष्यकाळात ठरावयाचें आहे. कारण ज्याच्या राजकीय चळवळीचा प्राण आध्यात्मिक–अहिंसक होता त्यांचा हिंसेनें घडलेला मृत्यू हा विरोधाभासापेक्षा त्यांच्या कार्याची पूर्तता म्हणूनच अधिक ओळखला जाणें शक्य आहे.

गांधींचा प्रभाव त्यांच्या मृत्यूबरोबरच नष्ट होणार नसून भविष्यकाळांत तो अधिक प्रखर होईल.

न्यूयॉर्क हेरॉल्ड ट्रिब्युन